# पं च क न्या

( लघुकथासंग्रह )

वा. वा. भोळे

सुविचार प्रकाशन मंडळ, लिमिटेड
कांग्रेसनगर, नागपूर

शके १८७० ] किंमत तीन रुपये [ सन १९४८

# अनुक्रम







# निवेदन

प्रस्तुत कथासंग्रहांतील तीन कथा—'अज्ञातसेवा' (१९३२), 'अमानुष स्त्री ?' (१९३२) व 'अविचारी प्रेमविवाह' (१९३३) पूर्वीच प्रसिद्ध झाल्या आहेत. 'शाल' व 'पतिपत्नी निवड' या अप्रसिद्ध आहेत. संग्रहांतील एकही पात्र विद्यमान किंवा गतकाळांतील व्यक्तींना उद्देशून रंगविलेलें नाही. उदाहरणार्थ, गांधी-इर्विन करारानंतर राजकीय कैदी सुटले त्या वेळीं अमरावतीस मी माझ्या खोलींत बसलों असतां त्यांच्या गौरवाच्या आरोळ्या कानीं आल्या व अंतःकरण अभिमानानं भरून येतं न येतं तोंच 'ज्यांनी स्वातंत्र्यसंग्रामांत प्रत्यक्ष उडी घेतली नाही पण मागे राहून देशाची 'अज्ञातसेवा' केली व जी मी प्रत्यक्ष पाहिली त्यांचं कौतुक कोण करील ?' हा विचार मनांत आला. कृतज्ञतेची भावना मनांत उसळली व त्या उसळींतूनच 'अज्ञातसेवे'चं कथानक बाहेर आलं व एकटाकी लिहिलं गेलं. असाच प्रकार इतर कथांचा आहे. कथानक व पात्रें काल्पनिक असलीं तरी प्रत्यक्ष जीवनाशीं त्यांचा कितपत संबंध आहे हें सहृदय टीकाकारांनीच ठरवायचें आहे. आपलें अपत्य सर्वांनाच प्रिय असतें. मीही त्याला अपवाद नाही; पण आपली कन्या प्रत्यक्ष संसारांत पडल्यानंतर स्वतःच्या व्यक्तित्वाने सहवासातल्या माणसांना अंतर्मुख करून त्यांच्या जीवनाचें कोडें सोडविण्यास कितपत साहाय्य करते यावरच तिचा गौरव अवलंबून आहे. पंचकन्यांपैकी एकीने तरी हें भाग्य प्राप्त करून घेतलें आहे असें निदान एका वाचकाकडून जरी कानावर आलें तरी 'पंचकन्यां'ना जन्म देऊन त्यांना जीवनप्रकाशांत उभें केल्याचें सार्थक झालें असें वाटेल. एरव्ही नाही. छापखान्याच्या नानाविध अडचणींतून मार्ग काढून छपाईचें काम उत्तम रीतीने केल्याबद्दल येथील नारायण मुद्रणालयाचे चालक श्री. पां. ना. बनहट्टी यांचा मी आभारी आहे. बाकी सर्व रसिकांचे स्वाधीन.

नागपूर
ता. २८-९-४८

सर्वांचा नम्र
वा. वा. भोळे

# पंचकन्या

## १ अज्ञात सेवा

' प्रिय नलिनी,

एकेरी नावानं संबोधल्याबद्दल मला क्षमा कर. तुझ्याविषयीच्या माझ्या भावनेनं मला हा हक्क दिला आहे. मुद्दाम हक्क वापरायचा म्हणून मात्र एकेरी नाव आलं नाही. पत्र लिहावयास बसलों व एकदम विचार न करतां लेखणींतून जे शब्द उतरले ते खोडण्याची कांही केल्या इच्छाच होत नाही. आज वर्षभर मनांत असलेली गुप्त गोष्ट तुला सांगण्याचं ठरवलं आहे. जन्मभर ती तशीच हृदयांत बाळगून ठेवावी अशी फार इच्छा होती. नलिनीवर माया करणारे इष्टमित्र व सखे कितीही असले, तरी नलिनी मात्र कोणावर माया करणं, गाढ प्रेम करणं, शक्य नाही असा माझा तर्क. सगळ्यांच्या भावनांशीं नलिनी खेळते. आईबाप, मित्र, मैत्रिणी सर्वांना नलिनी क्षणांत दूर वाटते तर क्षणांत जवळ वाटते. असं असून सुद्धा ती प्रत्येकाला हवी-हवीशीच आहे. तिचं हृदय दुसऱ्याच्या भावनांना ओढेण्याच्या दृष्टीनं पाहिलं असतां जरी मरुभूमीप्रमाण असलं तरी तें

हृदय बालकाप्रमाणं आहे. दुसऱ्यानं त्याला गोंजारावं आणि निर्हेतुक शुद्ध आनंदाचा आस्वाद घ्यावा हा त्याचा अधिकार. अशा हृदयाला हाक मारून लग्नाच्या विचारांत पाडण्याचं धैर्य, नलिनी, तुझ्या वडिलांच्या या आश्रिताला झालं नाहीं. तुझ्या वडिलांनी या अनाथाला आश्रय दिला, शिकवून शहाणं केलं. स्वतःच्या पायावर आज मी उभा राहिलों असलों तरी तुमच्या कुटुंबासमोर सदा नम्रच राहावं या भावनेनं माझ्या हृदयाला मी दडपून टाकीत असें. पण आज कळलं—एकाएकी कळलं—की गोपाळनं तुला मागणी घातली आहे. माझा दर्जा, तुमच्या-माझ्यातील अफाट अंतर मी ताड्दिशी ओलांडलं आणि आज-हा अज्ञात भाव—तुला—'

"विनू, विनू" नलिनीचीच ती हाक होती. नुसती हाक नव्हती तर दारावर तिने थाप द्यायलाही सुरुवात केली. विनायकाने झट्दिशीं नोटपेपर टेबलाच्या खणांत ठेवला. त्याची छाती धडधड करूं लागली. घोगऱ्या आवाजांत त्याने ओ दिली व दार उघडलें. नलिनी आंत आली, विनायक दाराची कडी धरून खाली पाहत उभा होता.

"किती हाका मारल्या! अरे, आज आता आपल्या विद्यार्थिसंघाच्या कार्यकारी मंडळाची तातडीची सभा आहे ना! अन् तूं-!"

"मी येत नाही." विनायकाने उत्तर दिलें.

"आपल्याला कांही कुठं जायचं नाही. सगळ्यांची इच्छा की, महत्वाची बैठक आहे, तेव्हा इथंच तुझ्या खोलींत जमूं सगळीं, अन् ठरवूं काय करायचं तें. सिंधु आताच येऊन गेली सांगून."

"मला सभेमध्ये भाग घ्यायचा नाही."

"कां? तूं सेक्रेटरी ना?"

"आजच मी राजीनामा देणार आहें."

" विनू ! What do you mean ? "

" I mean what I say. "

" What does he say ? " गोपाळ आंत शिरत म्हणाला. त्याच्या मागोमाग आणखी तीन चार त्याचे सहाध्यायी व सहाध्यायिनी होत्या. नलिनीला विनूच्या शब्दांपेक्षा त्याच्या वर्तणुकीचें आश्चर्य वाटत होतें. आजची सभा महत्वाची होती. म. गांधींनी देशांत सुरू केलेल्या चळवळींत आपल्या संघाने काय भाग घ्यावा याचा विचार करायचा होता; आणि आजच विनू–तिचा सेक्रेटरी— राज़ीनामा देतो ! त्याच्याविषयी तिला फार आदर होता. ती थोडीशी मूढ होऊन त्याच्याकडे बघत होती.

" काय म्हणत होता हा ? " गोपाळने पुन्हा प्रश्न केला.

" त्यालाच विचारा. " नलिनीने श्वास सोडून उत्तर दिलें व ती एका खिडकींत जाऊन उभी राहिली.

" काय रे म्हणत होतास विनायक ? "

" कांही नाही. आजच्या सभेमधे मी भाग घेऊं इच्छीत नाही. "

" कां ? "

" मी माझ्या जागेचा राजीनामा देणार आहें. "

" देणार आहांत ! दिला नाहीत ना ! चला, तोंपर्यंत तरी तुम्हांला बोलायला कांहीच हरकत नाही. Let us come to the point. " सिंधु मधेच उद्गारली. समोरचें काम उरकेपर्यंत ती दुसरा विचार कधीच करीत नसे.

" मला वाटतं आपण या वेळीं अंतःकरणापासून यांत सामील व्हावं. परवाच्या यूथ लीगच्या सभेमधे मी स्वातंत्र्याचा ठराव आणला होता ! आता मी माघार घेणं शक्य नाही." गोपाळ म्हणाला.

" तुझं म्हणणं बरोबर आहे. " माधवाने दुजोरा दिला.

"काय ग नलिनी?"

विचारमग्न नलिनी जागी झाली. ती गोपाळकडे व मधेच विनायककाकडे बघत होती. तिने नुसतें 'अंऽ' केलें.

"अंऽ काय! स्वप्नांत कां होतीस?" सिंधूने तिला छेडलें.

"मला माहीत आहे."

"मग सांग ना! तूं मनापासून चळवळींत भाग घेण्याला अनुकूल आहेस ना!"

"मला वाटतं अनुमतिदर्शक (permissive) ठराव करावा."

"कां? वडील आडवे येतील म्हणून वाटतं? तें कांही नाही. Youths must be youths." गोपाळ आवेशांत बोलला. एरव्ही नलिनीला त्याचें कांहीच वाटलें नसतें. ठराव परमिसिव्हच असावा असा तिने एरव्ही हट्ट धरला असताच असें सांगतां येत नाही; पण आपल्या वडिलांचें नांव अशा तऱ्हेने मधेच आणलें गेल्यामुळे ती एकदम चिडली. ठराव मॅन्डेटरी असावा, की परमिसिव्ह असावा, यावर दोघांचा कडाक्याचा वाद झाला. सर्वांच्या सोयीचा ठराव यदाकदाचित् व्हायचा तो राहून वाद भलत्याच दृष्टीने माजला. दोघेंही वादाच्या आहारीं पडून दोन टोकांला जाऊन बसलीं.

"पण मी म्हणतें आताच कशाला निर्णय द्या. सध्या चर्चा तहकूब ठेवूं. पुढे काय करायचं तें करूं." सिंधूने नवा मुद्दा मांडला.

"No No, आजच काय तें ठरलं पाहिजे." गोपाळ निश्चयाने म्हणाला.

"ठीक आहे. आताच ठरूं द्या काय तें!" नलिनी अद्याप चिडलेलीच होती.

"मी या चळवळींत भाग घेऊं शकत नाही." विनायक शांतपणें पण निश्चयाने बोलला.

"कां?" सर्वांनी एकदमच प्रश्न विचारला.

"या चळवळीचं स्वरूपच असं होणार आहे की, त्यांत प्रत्येकाच्या शीलाची परीक्षा होईल."

"हरकत नाही. मी तयार आहें." गोपाळ निश्चयाने बोलला. नलिनीने त्याच्याकडे बघितलें. ती किंचित् अस्थिर झाल्यासारखी दिसली.

"तुझं काय ठरलं आहे विनायक?" विनायकाकडे तो उत्सुकतेने पाहूं लागला.

"माझी तयारी नाही." विनायकाने वर मान करून सर्वांकडे पहात उत्तर दिलें. त्याच्या चेहऱ्यावर असा कांही भाव उमटला होता, की तो पाहून क्षणमात्र कोणीच बोलूं शकला नाही.

"कां बरं?" गोपाळने शेवटीं विचारलें.

"माझ्यांत तें धैर्य नाही. मी भ्याड आहें." तो तसाच धिटाईने व निश्चयाने वर बघत होता. पुढे प्रश्न विचारण्याची गोपाळचीही छाती झाली नाही. वाद पुन्हा मुद्द्यावर आला. जो तो आपापल्या स्वभावाप्रमाणे बोलत होता. एक तास झाला, निर्णय लागेना. गोपाळ शेवटीं चिडला व "मी ह्या चळवळींत सामील होणार; तुम्ही यायचं असेल तर या, नाही तर नका येऊं," असें म्हणून तो तडाख्याने निघून गेला.

"गोपाळचं म्हणणं बरोबर आहे. वादापेक्षा अंतःकरणाच्या तळमळीनंच या गोष्टी ठरत असतात." विनायक मनांत म्हणाला व स्तब्ध बसला. गोपाळनंतर बाकीची मंडळीही पांगली. नलिनी एकटी मागे राहिली. गोपाळविषयीच्या अभिमानाने तिचें हृदय भरून आलें; पण "मी भ्याड आहें" ह्या विनायकाच्या उद्गारांनी तिचें मन अस्थिर केलें.

"विनू तूं आपल्याविषयी म्हणालास तसं खरंच कां तुला वाटतं?" तिला राहवलं नाही.

विनायक किंचित हसला व "तें तुम्हीच ठरवा " एवढंच बोलला. दोघेंही जण कांही क्षण स्तब्ध होतीं.

"नलिनी! मला तुला कांही विचारायचं आहे." पहिल्यांदाच एकेरी नावानं मारलेली हाक ऐकून नलिनी आश्चर्यचकित झाली. तिने त्याच्या चेहऱ्याकडे बघितलें. विनायकाचा तो चेहरा, ती दृष्टि— कसला तरी विचार विद्युल्लतेप्रमाणे तिच्या डोक्यांतून निघून गेला.

"विनू, गोपाळरावांनी बाबांच्याजवळ माझ्याबद्दल मागणी घातली, अन् अन्—मी हो म्हटलं." जें मनांत आलं तें ती चट्दिशी बोलून गेली. विनायकाला काय वाटलं तें सांगतां येणं कठीण होतं. तो उभा होता, पण त्याचे हात कशाचा तरी आधार घेऊं पहात होते.

"तूं सुखी होशील ना पण?" कसा तरी एकदा त्यानं प्रश्न केला.

"मला असं वाटतं." तिनं खाली पाहिलं.

"उत्तम आहे. मी तुझं अभिनंदन करतों." त्याने चट्दिशी तोंड फिरविलें व तो खिडकीपाशीं जाऊन उभा राहिला. नलिनी अस्वस्थ झाली. आश्रित असला तरी विनायकाने ज्या बारीक सारीक पण असंख्य गोष्टींनी तिला उपकृत केलें होतें व त्या सर्वांचा एकत्रित असा जो परिणाम तिच्या मनावर झाला होता, तो, कां कोण जाणे, तिला या वेळीं एकदम आठवला. तिचे ओठ किंचित् कंपित झाले. एक दोन पावलें ती चटकन् त्याच्याकडे जाण्याकरतां निघाली; पण मधेच थबकली. त्याच्याकडे तिने एकदा पाहिलें व ती मुकाट्याने बाहेर गेली.



त्या खिडकीशीं उभा राहून विनायक किती तरी वेळ विचार करीत होता. नलिनी, स्वदेश, स्वत: तो, कितीतरी विचार या वेळीं त्याच्या डोक्यांत उकडत होते. बऱ्याच वेळाने त्याचा कांही तरी एक निश्चय झाल्यासारखा दिसला. तो टेबलापाशीं गेला; त्याने आपली डायरी घेतली व तो लिहूं लागला.

' गोपाळसंबंधीची तिची निवड बरोबर आहे. तो माझ्यापेक्षा श्रेष्ठ आहे, सुदृढ प्रकृतीचं सौंदर्य त्याच्यावर पसरलं आहे. तो धैर्यवान्, प्रामाणिक, मोकळ्या मनाचा व धडाडीचा तरुण आहे. ........मी बिनधडाडीचा, नेहमी मागं मागं राहूं इच्छिणारा...... नलिनी चुकली असं कसं म्हणतां येईल ? पण......त्याच्याकडून ती प्रेम करून घेईल ? ती त्याच्यावर प्रेम करील का ?' पुरुषावर तिला प्रेम करतां येणं शक्य आहे का नाही, याचा विचार........ गोपाळ........जाऊं दे, तिनं निवड केली आहे. ती सुखी होवो, एवढंच ईश्वरापाशीं माझं प्रार्थनापूर्वक मागणं आहे........मी स्वत:ला भेकड म्हणवून घेतलं........ती दु:खी झाल्यासारखी दिसली. वेडे, शब्दांत काय आहे ? ज्याच्या त्याच्या कृतीनंच जो तो आपली किंमत या वेळीं ठरवून घेईल, हें कसं तिला समजत नाही ?'........ आणखीही तो लिहीत होता. शेवटीं त्यानं डायरी खाली ठेवली व एका नोटपेपरवर खालील पत्र लिहिलें.

मुंबई, ता. ३०-४-३०

मि. सी. एस्. ब्राउन,

मॅनेजर + + + + + कंपनी, फोर्ट मुंबई,

यांस—

मला कळविण्यास अत्यंत वाईट वाटतें की, उद्यापासून मी आपल्या कंपनींतील माझ्या जागेचा राजीनामा देत आहें.

त्याचा स्वीकार व्हावा. माझी सर्व सहानुभूति देशांतील चळवळीकडे या वेळीं गेली पाहिजे. आपली कंपनी सर्वस्वीं परदेशी आहे; तेथे मी एक मिनिटभर आता राहूं शकत नाही. आपण मला मोठा पगार देत होतां व व्यापाराची बाजू सर्व तऱ्हेने शिकण्याची संधिही आपल्या कंपनींत मला उत्तम होती, हें मी कबूल करतों; पण माझा नाइलाज आहे. नोकरीवर मी असेतोंपर्यंत आपण मला फार प्रेमाने व आदराने वागवलेंत याबद्दल मात्र मी सदैव कृतज्ञ राहीन.

आपला नम्र,
विनायक गणेश मोघे.

त्याने एकदा पत्र नीट वाचून पाहिलें. काळजीपूर्वक त्याची घडी करून तें पाकिटांत घातलें. पत्ता लिहिला. शांतपणाने खुंटी-वरची कोट टोपी काढून अंगावर चढवली व तो घराबाहेर पडला. रस्त्याने राष्ट्रीय मिरवणूक चालली होती ती पाहण्याकरतां दोन्ही बाजूंचे फुटपाथ माणसांनी फुलून गेले होते. विनायकाने मिरवणूक टाळली व दुसऱ्या रस्त्याने तो पोस्टाकडे गेला.

—२—

विनायक अनाथ होता. पण तो होतकरू असल्यामुळे दादासाहेबांनी—नलिनीच्या वडिलांनी—त्याला आश्रय दिला होता. आश्रयाचें त्याने चीज केलं. नलिनीला त्याने शिकवावें, तिच्या अभ्यासांत मदत करावी, ती आजारी पडली की तिची अविश्रांत शुश्रूषा करावी. नलिनीला कांही मनापासून हवें असलें म्हणजे तिने अगदी विश्वासाने विनायकाचा पिच्छा पुरवावा, त्यानेही त्या विश्वासाला अनुरूप असें सहज वागावें. पाहिजे तें मिळाल्या-वर नलिनीने एखाद्या लहान मुलाप्रमाणे त्याच्याकडे पाहून हसावें

व त्याला चटकन विसरून जाऊन प्राप्त वस्तूच्या आनंदांत निमग्न व्हावें, विनायकाने त्या बाल्यानंदाचें कौतुक करावें, असा क्रमच ठरलेला होता. स्वतः तो हुशार होता. पहिल्या वर्गांत तो बी. ए. पास झाला होता. वकिली किंवा इतर दुसरा धंदा करण्या-पेक्षा आपण व्यापारांत शिरावें आणि इंग्रज कंपन्यांत शिरकाव करून घेऊन त्यांचा स्वभाव, व्यापाराची पद्धत व कौशल्य याचा अभ्यास करावा, या उद्देशाने त्याने एका इंग्रजी कंपनींत नोकरी धरली. दादासाहेबांच्या वशिल्याचा त्याला फार उपयोग झाला. नोकरी लागून महिना झाला नसेल तों त्याने राजीनामा दिला. अर्थातच दादासाहेब बरेच चिडले होते. त्यांतून नलिनीकरतां त्यांच्या जोगें गोपाळचें उत्तम स्थळ सांगून आल्यामुळे प्रथम ते फार खुषींत होते. पण त्याच गोपाळने श्रीमंतीच्या ऐपआरामाला लाथ मारून, लग्न लांबणीवर टाकून, कायदेभंगाच्या चळवळींत एकदम उडी घेतली हें पाहून त्यांचा राग जास्तच भडकला होता. ते एक पेन्शनर रावबहादुर होते. निव्वळ वर्तमानपत्रांतल्या क्षोभक बातम्या चहाच्या किंवा जेंवायच्या वेळेला आपण व मुलीने एकमेकांला सांगून त्यांवर चर्चा करावी, यापलीकडे त्यांना कांही रुचत नसे. अर्थात गोपाळ पहिल्या धडाक्यांत तुरुंगांत गेला व नलिनी त्याला शक्य तों अधिक भेटायला जाते व त्याच्याविषयी शक्य तों वारंवार उघड सहानुभूति व्यक्त करते हें त्यांच्या मनाला तितकेंसें रुचेनासें झालें होतें. ठरलेला विवाह शक्य असल्यास मोडण्याचेही विचार मधून मधून त्यांच्या मनांत डोकावत असत. पुष्कळ आडमार्गांनी त्यांनी नलिनीच्या वागण्या-बद्दल नापसंती व्यक्त केली होती; पण नलिनीच्या वागण्यांत कांही सुधारणा नव्हती. ती प्रत्यक्ष चळवळींत अद्याप भाग घेत नाही एवढ्याच गोष्टीवर ते अखेरीस संतुष्ट होते. तिच्यावर त्यांनी

दाब ठेवला होता तरी ती कोणत्या वेळीं कसें वागेल याचा त्यांना भरवसा मात्र नव्हता. दुसरीही एक थोडीशी त्यांच्या मताप्रमाणे बरी गोष्ट म्हणजे अशी की, विनायकाने नोकरी सोडली तरी तो सभा, मिरवणुकी वगैरे कोणत्याही ठिकाणीं जावयाचा नाही. मात्र तो रात्रीं निजण्याव्यतिरिक्त फारसा घरांत नसे; परंतु याचेंही त्यांना आश्चर्य वाटलें नाही. खाणावळींत जेवायला (नोकरी लागल्यापासून त्याने कोणाचेंही न ऐकतां खाणावळींत जेवावयास सुरवात केली होती,) आणि नंतर उद्योगधंदा शोधायला तो बाहेर जात असावा असा त्यांचा समज झाला होता. किंबहुना तसा विनायकाने थोडा करूनही दिला असण्याचा संभव होता. त्याने नोकरीचा पुष्कळ शोध केला; पण व्यापार व इतर धंदे यांना मंदी असल्यामुळे त्याला कोठेच नोकरी मिळेना. अखेरीस एका भाटयाचा इंग्रजी पत्रव्यवहार दोन तास बघून तीस रुपये महिना तो नुकताच मिळवूं लागला होता. दोन वेळचा चहा, जेवण व चिल्लर खर्च एवढें त्यावर त्याचें भागत असे. वरील दोन तासांव्यतिरिक्त स्वतःचा इतर वेळ तो कसा घालवीत असे हें एक त्याचें त्यालाच माहीत. नलिनीबरोबर कधी कधी तो गोपाळला भेटावयास जात असे इतकेंच; पण काय असेल तें असो, अगोदरची त्याची अशक्त प्रकृति आता नलिनीच्या डोळ्याला अधिक वाईट दिसूं लागली होती. कारण विचारायचा तिला धीर झाला नसला तरी हा प्रकृतीचा फरक ती वारंवार पण नकळत निरीक्षीत होती; व विशेष गोष्ट ही की स्वतःचें हें निरीक्षण तिच्या स्वतःच्या लक्षांत मधूनच एकदम येत असे.

दादासाहेब, विनायक व नलिनी अशा स्थितींत असतां चळवळीचा मे व अर्धा अधिक जून महिना लोटूनहि गेला होता. सार्जंट व पोलीस यांची लाठी हवेमध्ये अधिकाधिक तरंगूं लागली

होती. तो रविवारचा दिवस होता. सकाळीं ७ वाजतां दादासाहेब व नलिनी चहा घेत होती. कारणाव्यतिरिक्त दोघांत फारसें बोलणें होत नव्हतें. विनायक स्नान करून बाहेर जाण्याच्या तयारीने तेथे आला. दादासाहेबांनी त्याला चहा घेण्यास हाक मारली. तो मुकाट्याने चहा घेऊं लागला. काय असेल तें असो, तोही अलीकडे अबोल झाला होता. त्यामुळे तो तेथे आल्याने म्हणजे कांही विशेष गप्पागोष्टी होण्याचा संभव होता असें नाही. चहा चालू होता इतक्यांत "वंदे मातरम्"चे जयघोष रस्त्यावरून ऐकूं आले. दादासाहेब चट्दिशी उठून खिडकीपाशीं गंमत पाहण्यास गेले. नलिनीही दुसऱ्या खिडकीपाशीं गेली. दादासाहेबांनी हाक मारली तरी विनायक उठला नाही. आज आझाद मैदानावर राष्ट्रीय ध्वजावंदन होणार होतें व तिकडे सर्व स्वयंसेवक मिरवणुकी काढून जात होते. या समारंभास सरकारकडून बंदी झाली होती. त्यामुळे या मिरवणुकीला व वंदनसमारंभाला अपूर्व महत्व आलें होतें. समारंभ पाहावयास जाण्याची नलिनीने चहा पितांना सहज इच्छा दर्शविली व तितक्याच सहजपणें दादासाहेबांनी ती खोडून काढली. तेव्हापासून तिच्या डोक्यांत खळबळ उडाली होती. आता खिडकीपाशीं जाऊन जेव्हा ती मिरवणूक पाहूं लागली तेव्हा तर ही खळबळ तिच्या चेहेऱ्यावर अधिकाधिक स्पष्ट होऊं लागली. एकाएकीं ती खिडकीपासून दूर झाली व उत्साहाने खाली जातांना दिसली. विनायकाच्या दृष्टींतून या सर्व गोष्टी गेल्या नाहीत. त्याला काय वाटलें तें सांगतां येत नाही; पण तोही तितक्याच झपाट्याने तिच्या मागोमाग गेला.

दोघेही जण आपणाप्रमाणेच मिरवणूक पहात आहेत या समजुतीने दादासाहेब खिडकीपाशीं उभेच होते, नंतरही ते आंत आले तरी त्यांना नलिनीविषयीशंका घेण्यासारखें कांहीच दिसलें

नव्हतें. त्यामुळे ती आपल्या मैत्रिणीकडे आणि विनायक आपल्या कामाला गेला असेल या भरवशाने ते स्वतःच्या उद्योगाला लागले.

इकडे नलिनी नुसत्या चपला कशातरी पायांत चढवून जी झपाट्याने बाहेर पडली ती ऑपेरा हाऊसच्या ट्रॅममधे जाऊन बसली. तिने बोरीबंदरचें तिकीट घेतलें. ट्रॅम चालू झाली; पण तिचें लक्ष तिच्या अंतरंगाकडे असल्यामुळे आपण धड वेणीफणीही नीट केली नाही याचीही तिला दाद नव्हती. धोबी तलावाजवळ ट्रॅम थांबली. उतरण्याच्या तयारीने तिने मागे पाहिलें तों मागच्याच एकदोन बाकांपलीकडे विनायक बसला होता. त्याने आपलें तोंड वर्तमानपत्रांत खुपसल्यासारखें दिसत होतें. नलिनीला ह्या वेळीं कांही विलक्षण वाटलें; परंतु ज्या चळवळींत आपणास भाग घ्यायचा नाही तिच्या समारंभाला नुसतें तमासगिराप्रमाणे जाणें त्याला आवडत नाही हें एकदा त्याच्याच तोंडून तिने ऐकलें असल्यामुळे ती कांही न बोलतां खाली उतरली व झेंडावंदनाच्या ठिकाणीं झपाट्याने गेली. एकदोन वेळां मागे धावती नजर टाकून विनायकाचा शोध तिने अगदी सहज केला; पण लोकांच्या त्या समुद्रांत तो बुडून गेल्यासारखा झाला होता. ती तडाक्याने पुढे गेली व ध्वजावंदनाच्या जागेजवळ कांही स्त्रीस्वयंसेविका निशाणें घेऊन उभ्या होत्या त्यांच्या मागे उभी राहिली.

क्षणांत पोलीस व सार्जंट यांची तुकडी आली. त्यांनी त्या सेविकांना तेथून जाण्याविषयी तीनदा सांगितलें; पण त्यांनी जाण्याचें नाकारलें व राष्ट्रीय निशाण मध्ये घेऊन त्या उभ्या राहिल्या. पोलिसांनी निशाण हस्तगत करण्याची खटपट केली. त्यांत सेविका व सार्जंट यांची निकराची झटापट सुरू झाली. ती इतकी निकराची होती की, भोवतालच्या सर्व लोकांचें लक्ष तिकडे वेधून राहिलें. उत्साहाच्या भरांत 'वंदेमातरम्'चा एक-

सारखा जयघोष होत होता. 'शेम शेम ' ह्मणून सार्जेटकडे पाहून लोक आरोळ्या ठोकीत होते. तो सार्जेट त्यामुळे चिडला. त्याने त्या स्वयंसेविकेच्या केसाला धरून जोराने तिला तीनदा जमिनी-वर आपटलें. शेमचा वर्षाव त्याच्यावर झाला. स्वयंसेविकेने तरीही निशाण सोडलें नाही. त्या शेमच्या आरोळ्यांनी तो सार्जेट अधिकच खवळला व तो वर हात उगारून तिला मारणार तों नलिनीचा स्वतःवरचा ताबा उडाला. 'यू ब्रूट ' ह्मणून ती तीरासारखी धावत गेली व एका स्वयंसेवकाच्या हातून त्वेषाने राष्ट्रीय निशाण हिसकावून घेऊन त्या सार्जेटच्या पाठीवर तिने ताड् ताड् पांच सहा काठ्या उडवल्या. सार्जेटने स्वयंसेविकेला सोडलें व नलिनीला पोटांत जोराचा धक्का दिला. त्यामुळे ती खाली पडली. तिच्या हातांतली गळून पडलेली काठी उचलून तो सार्जेट तिला मारणार तों एक तरुण त्याच्या व तिच्यामधे येऊन उभा राहिला. काठीचा सर्व मार त्याने आपल्या अंगावर घेतला. त्याने नलिनीला उचललें व धावतच तिला तो ambu-lance कडे घेऊन जाऊं लागला. वाटेंत त्याच्यावर काठ्यांचा वर्षाव होत होता. त्याला डोक्यावर व इतरत्र जखमा झाल्या, रक्त वाहूं लागलें, पण तिकडे त्याचें लक्ष नव्हतें. नलिनीच्या तोंडांतून रक्ताची गुळणी आली होती तिकडे तो पहात होता. नलिनीची त्याची दृष्टादृष्ट झाली. तिच्या डोळ्यांत पाणी आलें. व बोलण्या-करतां ती ओठ उघडते तोंच पुन्हा रक्त ओकली व मूर्छित झाली.

नलिनी जागी झाली तेव्हा तिला आपण कोठे आहोंत हेंच प्रथम लक्षांत येईना. ती सभोवार पाहूं लागली तों आठदहा पलंग शेजारीं असून त्यांवर जखमा झालेले स्वयंसेवक पडले आहेत असें तिला दिसलें. त्यांचें विवळणें तिला ऐकूं आलें. आपण कोणत्या तरी हॉस्पिटलमधे आहोंत याची तिला जाणीव झाली.

एकदम तिला विनायकाची आठवण झाली व ती इकडे तिकडे पाहाणार तों दोन गृहस्थ येऊन शेजारच्या पलंगाजवळ उभे राहिले. त्यांतील एक श्रीमान गृहस्थ होता; दुसरा विनायकाच्या वयाचाच एक तरुण डॉक्टर होता. डॉक्टर त्या गृहस्थाला पलंगावर निजलेल्यांच्या जखमाची माहिती देत होते; ती देऊन झाल्यावर त्या गृहस्थाने एकदम प्रश्न केला, " पण काय हो, हॉस्पिटलमधे दहाच बेड्स कां ठेवले ? " " जास्त पैसा मिळेना व जागाही थोडक्या भाड्यांत मोठी आणि हवेशीर मिळेना, म्हणून तर इकडे लांब परळच्या बाजूला, ही लहानशी, एकांत अशी जागा घेतली. इतर हॉस्पिटलमधे जेव्हा फार गर्दी होते तेव्हा आम्ही जखमा झालेले लोक इकडे आणतों." डाक्टरांनी उत्तर केलें.

" अस्सं. पण या हॉस्पिटलची कल्पना कुणी काढली ? "

" कल्पना होय ? आमचे एक सहाध्यायी हायस्कूलमधले होते, त्यांनीच ही कल्पना प्रथम काढली व दिवसरात्र घरोघर हिंडून पांचसहा हजार रुपये मिळवले. मध्यम वर्गाच्या मदतीवर हीं संस्था चालू आहे; त्यामुळे पैसा गोळा करतांना फार श्रम पडले. आम्ही एकदोन स्नेही डॉक्टर इथं मदत करतों. उगीच गाजावाजा केलेला त्यांना आवडत नाही म्हणून हें हॉस्पिटल फारसं कुणास माहीत नाही. ते पहा ते गृहस्थ; तिथं बँडेज तयार करताहेत ते. "

" ते ? कपाळाला पट्टी आहेत ते का ? "

" होय. आजच्या मारांत त्यांनाही जखमा झाल्या. मी विश्रांति घ्या म्हटलं, पण रोगी आज जास्त असल्यामुळं कपाळाला पट्टी बांधून ते नर्सेसना मदत करताहेत. वर्गणी गोळा करून शिवाय रोज इथं दोनतीन तास ते नर्सिंगही करतात. ".

" काय ? तो किडकिडीत अशक्त मनुष्य ? capable of so much ? ( एवढें सर्व करूं शकतो ? )"

"त्यांचं शरीर दुबळं असलं तरी आंतली ज्योत जागती आहे."

" काय नांव त्यांचं ? "

" विनायक गणेश मोघे " डॉक्टर म्हणाले, " चला मी त्यांची ओळख करून देतों. " दोघेही तिकडे गेले. नलिनीने तें नांव ऐकलें, ते जात होते त्या दिशेकडे बघितलें. तो विनायकच होता. तिच्या नाडीचे ठोके जोराने पडूं लागले-डोळ्यांत अश्रु उभे राहिले. एकसारखी त्याच नजरेने ती त्याच्याकडे पहात होती. ते गृहस्थ विनायकाशीं चारपांच मिनिटें बोलले. खिशांतून बऱ्याच नोटा काढून त्यांनी विनायकाच्या हातांत दिल्या व ते निघून गेले. विनायकाने त्यांच्याकडे कृतज्ञतेने पाहिलें. नोटा डॉक्टरांच्या हातांत दिल्या व ड्रेसिंगचें सामान उचलून तो दुसरीकडे जाणार तों नलिनीकडे त्याची नजर गेली. तिची मूर्च्छा जाऊन ती डोळे उघडे करून आपल्याकडे बघते आहे हें त्याला दिसलें. तीरासारखा तो तिच्याकडे गेला व तिच्या पलंगाजवळ उभा राहिला. नलिनीला जोराचा उमाळा आला व एकदम तिने आपला हात पुढे केला. विनायकाने तो धरला. " नलिनी, तूं खरं नाणं आहेस. मला तुझ्याबद्दल अभिमान वाटतो. " विनायकाचे शब्द तिने पुरे ऐकले की नाही तें सांगतां येत नाही. दुसरें कांही तरी बोलण्याकरतां तिचे ओठ स्फुरण पावले; पण तिच्या भावनांचा उद्रेक तिच्या मेंदूला असह्य झाला. तिच्या नाकपुड्या व हात थरथर कापूं लागले, व ती पुन्हा मूर्च्छित झाली. ओठावरचे शब्द तेथेच विरून गेले. मात्र त्या वेळची तिची चर्या विनायकाला किंचित् निराळी भासली. ते शब्द कांही तरी अमोल असावेत या समजुतीने कित्येक दिवस त्याला चुटपुट लागली होती.

समजूत घातली.… घरीं यायला निघालों. वाटेंत पोस्टमन भेटला. त्याने शेठचं पत्र दिलं…त्यांच्या दुकानचा पत्रव्यवहार माझ्या हातून वेळेवर होत नाही, म्हणून त्यांनी दुसरा मनुष्य ठेवला…. ठीक आहे…another battle with fate……There is God. He at least will never let me down…कसेंही पोट भरवील अशी श्रद्धा आहे.

"हॉस्पिटलमधून फोन, अर्जंट काम, गेलेंच पाहिजे.

दुपार १. ता. २९-१२-३०

वि. ग. मोघे."

तिने डायरी खाली ठेवली. "उपाशी—कदाचित् तीन दिवसही." ती एकदम उठली व मागे वळते तों विनायक दारांत उभा. क्षणमात्र दोघेंही एकमेकांकडे पहात उभीं होतीं.

"तुमचं जेवण झालं का?" तिने तसेंच पहात विचारलें. "तुमचं जेवण झालं का?" त्यानं तेंच वाक्य मनांत पुन्हा उच्चारलें. एकेरी नांवाऐवजी बहुमानार्थी शब्द आला. त्याला आश्चर्य वाटलें. त्याने तिच्याकडे जरा धिटाईने बघितलें.

"तिच्या डोळ्यांत आदर काठोकाठ भरला आहे" क्षणमात्र तो भयचकित झाला; अगदी क्षणमात्र. लगेच भानावर येऊन त्याने "नाही" म्हणून उत्तर दिलें. खोटें बोलण्याचा त्याने निश्चय केला, पण अखेर प्रत्यक्ष बोलतांना खरें बोलला. जवळ जवळ त्याला धक्का देऊनच ती खाली गेली. विनायक तिच्याकडे पाहत राहिला. नंतर त्याने एक श्वास सोडला व तो टेबलाकडे वळला. तेथील सर्व वस्तु आवरल्या व घाईने कोटटोपी घालून तो दरवाजांत येतो तों, स्वयंपाक्याने एका बशींत पुऱ्या व भाजी आणलेली त्याला दिसली.

" बाईनी पाठवलं आहे." तो म्हणाला.

" कुठं आहेत बाई ? " त्याने उत्सुकतेने विचारलें.

" स्वैंपाकघरांत····स्वैंपाकघरांत······"

" स्वयंपाक घरांत काय····? "

" रडनाहेत. "·

विनायकाने बशी त्याच्या हातून एकदम जवळजवळ हिसकावूनच घेतली. एरव्हीं एक घास रानड्यांच्या प्रमाणे बत्तीस वेळां चावणाऱ्या विनायकाने एका घासांत सर्व पुऱ्या तोंडांत कोंबल्या; भाजीचाही तोच प्रकार केला व " जा लवकर खाली. ही बशी बाईंना आधी दाखव." असें म्हणून स्वयंपाक्याला त्याने जवळजवळ जिन्यावरून लोटलेंच. लगेच दुसऱ्याच क्षणीं तो शांत झाला—क्षणमात्र—विचारमग्न झाला. पुन्हा त्याने डायरी बाहेर काढली व तींन एकच वाक्य लिहिलें, Thank God! It is not an absolutely barren soil. "

डायरी ठेवून तो भरकन् बाहेर पडला.

—४—

गांधी आयर्विन् समेट होऊन दोनतीन दिवस लोटले होते. राजकीय कैदी एकामागून एक सुटत होते. रस्त्याने त्यांच्या मिरवणुकी निघत होत्या, 'वंदे मातरम्' चा व त्यांच्या नांवांचा जयघोष होत होता. सर्व मुंबई आनंदाने फुलली होती.

संध्याकाळीं गोपाळ सुटणार म्हणून त्याचें स्वागत करण्याकरतां नलिनी जेलमधे गेली होती. गोपाळ सुटला. त्याची व तिची भेट झाली. तिने त्याचें मनापासून, अभिमानाने, आपलेपणानें स्वागत केलें. तिला जास्त बोलण्यास लोकांनी फुरसत दिली नाही.

त्यांनी गोपाळला मोटारींत बसवून त्याची मिरवणूक काढली. पुष्प-हारांनी भूषित अशी त्याची मूर्ति पाहून तिला फार-फार आनंद झाला; पण तो आनंद परमावधीला पोंचण्यापूर्वी कसली तरी आठवण येऊन तिला गहिंवर आला. चटकन मुकाट्याने ती मिरवणुकींतून निसटली व बाजूच्या रस्त्याने ट्रॅम गाठून त्यांत घरीं येण्याकरतां बसली. ट्रॅमजवळ वर्तमानपत्रवाले ओरडत होते. तिच्या आवडीच्या वर्तमानपत्राचें नांव ऐकतांच त्या व्यग्र स्थितींतून ती जागी झाली. एक आणा देऊन तिने तें पत्र विकत घेतलें व आतुरतेने अग्रलेखाकडे नजर टाकली. हें वर्तमानपत्र एक दैनिक होतें. लहानसें होतें, त्याचा फारसा खपही कदाचित् नसेल .... पण अलीकडे दोन महिन्यां-पासून, काय असेल तें असो, तें तिच्या फार आवडीचें झालें होतें. त्यांतील अग्रलेख व स्फुटें ती आतुरतेने वाचीत असे. संपादकाच्या बुद्धिवैभवाने किंवा ज्ञानाने ती भारली गेली होती असेंच कांहीं म्हणतां येत नाही; पण एवढें मात्र खास की, ज्या भूमिकेवर उभे राहून संपादक चालू विषयांचें प्रतिपादन करीत ती भूमिकाच तिला एकदम आकर्षून घेई. त्या भूमिकेवर स्वभावतःच आपण उभे आहोंत असें तिला वाटे. निदान ती भूमिका आपणांस चटकन् समजूं शकते याच गोष्टींत तिचें मन कल्पनातीत रमत असे. तिने अग्रलेख वाचला; आणि तिला घरीं जाण्याची दुप्पट ओढ लागली. ट्रॅममधून तिने उडीच मारली. ती घरीं पोंचली व तडक विनायकाच्या खोलींत शिरली.

खुर्चीच्या पाठीला टेकून विनायक पडला होता. ती हलकेच जवळ गेली. तिला वाटलें त्याला झोप लागली आहे. टेबलावर एक लेख व जवळच डायरी उघडी पडली होती. लेखाला टाचून एक लहानसें पत्र होतें. तें एका संपादकाला लिहिलें होतें. त्या संपादकाचें नांव वाचतांच तिला तें वाचण्याची

अनावर इच्छा झाली. तिच्या आवडीच्या वर्तमानपत्राच्या संपादकास तें लिहिलें होतें, .... "आज दोन महिने तुरुंगांत गेलेले आपल्या पत्राचे संपादक सुटतील. त्यांच्या गैरहजेरींत पत्र बंद पडूं नये म्हणून मी तें पत्र स्वतःचें नांव न देतां चालविलें. संपादक आज सुटतील. मनांत केलेला वरील संकल्प परमेश्वरकृपेने अखेरपर्यंत पार पडला याबद्दल परमेश्वराचे आभार मानून हा शेवटचा अग्रलेख आपणांकडे पाठवीत आहे." खाली विनायकाची सही होती.

आपल्या आवडत्या पत्रांतील लेखाचा जनक विनायक !—विनायक—तिला काय वाटलें, कसें वाटलें, हें तिचें तिलाच समजण्यापूर्वी तिची नजर डायरींतील एका शब्दाकडे गेली. तो शब्द 'गोपाळ' हा होता. ती वाचूं लागली, "........ गोपाळ आज सुटणार........ कोणत्या तोंडाने त्या मित्राला भेटायला जाऊं ! —त्याच्या मानाने माझ्यासारख्या नादान दुबळ्या जीवाने—" पुढे तिच्याच्याने वाचवेना. तिला जोराचा हुंदका आला व तिने कसलाही विचार न करतां त्याचें मस्तक हृदयाशीं धरलें व ती आवेशाने रडूं लागली. विनायक खडबडून जागा झाला व हा प्रकार पाहून स्तंभित होऊन गेला. स्वतःला त्याने सोडवून घेतलें. "नलिनी, हें काय ! गोपाळ आज सुटणार आणि तूं ?—"

"मी-मी-ही अज्ञात सेवा पहायला—तीबद्दल कृतज्ञतेचे अश्रु द्यायला आलें आहें.—" रडण्यापूर्वी ती कसेंबसें बोलली.

"नलिनी, हें काय ? गोपाळ वाट—"

"मी त्यांना भेटून आलें. ते मिरवणुकींत आहेत. या अज्ञात सेवेमुळे चाललेले तुमचे हाल मला आता बघवत नाहीत हो !"

"अज्ञात सेवा ?. कसली ? कुणाची ?"

नलिनीने टेबलाकडे बोट दाखविलें. विनायक समजला. त्याने चटकन् लेख लपवण्याकरतां हात पुढे केला. नलिनीने तो मधेच धरला.

"माझ्यापासून ही अज्ञात सेवा लपवून ठेवण्याचा याउपर तुम्हांला अधिकार नाही. विनु-विनुदा-विनुदादा, ऐका. गोपाळरावांशीं लग्न करण्याची दादांनी मला बंदी केली आहे. पण मी त्यांच्याशीं-तुरुंगांतून सुटल्यावर ते माझी किती किती बरं वाट पाहतील ?-हो त्यांच्याशींच, प्राण गेला तरी मी लग्न करणार. .... पण....पण परमेश्वरसाक्ष मी निक्षून सांगतें-लक्षांत ठेवा-त्यांच्याशीं लग्न झालं तरी, तुमच्या-तुमच्या मैत्रीशिवाय माझं जीवन परिपूर्ण झालेलं मला कधीही वाटणार नाही."

तिचें सर्व शरीर कापत होतें. डोळे डबडबून आले होते. दोघेही जण एकमेकांकडे टक लावून बघत होतीं. विनायकाच्या कृश शरीरांतील पंचप्राण त्याच्या डोळ्यांत गोळा झाले होते; दोघांच्याही नजरेंत इतकें पावित्र्य भरलें होतें की कोणत्याही पापी विकाराने त्यांच्या पापण्या क्षणभरही लवल्या नाहीत. विनायकाने तिचा हात धरला, त्याने इतक्या जोराने तो दाबला की, तो हिरवानिळा झाला; पण नलिनीने हूं की चूं केलें नाही. तिची नजरही दुसरीकडे वळली नाही.

"नलिनी I understand. I am content—after all world is not such a barren soil. या जगांत मनुष्याला पुसटतं का होईना पण एकदा तरी परमेश्वराचं दर्शन घडतं म्हणायचं !"

वरील शब्द इतके कळवळून तो बोलला, की त्याला ग्लानि आली. तो खाली पडण्यापूर्वी नलिनीने त्याला सावरलें. त्या एका सावरण्यांत विश्वांतील परमेश्वरनिर्मित सर्व वात्सल्यरस साठवलेला होता. ती तशीच त्याला घेऊन उभी होती. बाहेर गोपाळच्या नांवाचा जयजयकार झाला. एकदा, दोनदा, दहा वेळां तिच्यो कानीं तो जयजयकार आला. तिचें शरीर रोमांचित झालें. गोपाळचा व तिचा विवाह ठरल्यावर हा पहिलाच क्षण होता की, विनायकाला सोडून गोपाळला खिडकींतून पहाण्याचा मोह तिला झाला नाही.

या एकाच क्षणांत तिच्या हृदयसागरांत कोणते भाव साठवले होते. हें जर मला बरोबर सांगतां आले असतें तर मी माझी लेखणी इथेच कशाला खाली ठेवली असती ?

आजचा प्रसंग म्हणजे कृष्णाला नवीन होता असं नाही. पूर्वीसुद्धा असलं प्रसंग येऊन गेले होते. परंतु तऱ्हा एकच असली तरी पुष्पाकडून थोडा अतिप्रसंग झाला असं कृष्णाला वाटलं. व्हरांडयाच्या खांबाला टेकून तो एकाग्रतेने विचार करीत होता. त्याची मेहुणी पुष्पा हिनं वादाच्या भरांत मधुकरला-आपल्या भावाला-हलकट म्हटलं. तो त्यावर चिडला. सुलोचनेनंही-कृष्णरावांच्या पत्नीनं-तिच्यावर ताशेरा झाडला. तशी ती उठून आपल्या खोलींत चालती झाली. कृष्णाही तिच्या मागोमाग उठून व्हरांडयांत जाऊन विचार करीत उभा होता. त्या मंडळींत, पुष्पा उठून गेल्यावर—का कुणास ठाऊक—पण त्याला बसणं अशक्य झालं.

घडलेला प्रसंग किती क्षुल्लक ! पण वाद झाला. नेहमी-प्रमाणे उन्हाळयाच्या सुट्टींत सुलोचनेच्या माहेरीं कृष्णा व ती आलीं होतीं. मधुकर, पुष्पा, सुलोचना व कृष्णा यांच्यामधे अर्थात समवयस्कतेमुळे वादविवाद होत. त्या भावंडांत जेमतेम एक एक वर्षाचं अंतर होतं. कृष्णा त्यांच्यापेक्षा ३।४ वर्षांनीच मोठा. त्यामुळे ते सर्व समवयस्कच होते असं म्हणायला कांहीच हरकत नव्हती.

शॉ, रसेल वगैरे वाचण्याचा पुष्पाला भारी नाद. मधुकर वाची, पण तें केवळ दुसऱ्यावर 'इंप्रेशन' मारण्यापुरतं. पुष्पा जरा त्यावर विचार करीत असे, त्यामुळे तिच्यापुढे मधुकरचं फारसं चालत नसे. अन् चालत नाही असं दिसलं की एक वर्षाच्या वडीलकीचा अधिकार गाजवून तो तिला चूप बसवीत असे. परंतु नुकतीच एक गोष्ट अशी घडली होती की, केवळ वडीलकीचा अधिकार गाजवणं त्याला अशक्य झालं होतं. बुद्धीनं तो साधारणच होता. बी. ए.ला तो दुसऱ्यांदा नापास झाला. पुष्पा त्याच्या वर्गामधे येऊन बसली. यामुळेच तो थोडासा आंतून वरमला होता. यंदा तो नी पुष्पा बी. ए. ला बसलीं. ती ऑनर्समधे पास झाली. तो पुन्हा नापास. परीक्षांचा निकाल लागून ७-८ दिवस झाले होते. आपण बी. ए. ऑनर्स् झालों तरी आपला भाऊ नापास झाला या दडपणामुळे पुष्पाला आनंद दाखवतां येईना व वडील बहिणीची व मेहुण्याची ती लाडकी असूनही त्यांनाही तिचें त्याच कारणामुळे फारसें कौतुक करतां येईना.

पुष्पाच्या आयुष्यांतले प्रसंगच चमत्कारिक. ती मॅट्रिक पास होऊन पहिल्या पांचांत आली, तों सुलोचना इंटरला 'फेल'. लगेच सुलोचनेचं लग्न झालं हा भाग वेगळा. ती इंटरला पहिल्या वर्गांत आली, तों भाऊ बी. ए. ला नापास. तिचं कौतुक कोणी केलं नाही. आतापर्यंतचा तिचा स्वतःचा आनंद आंतल्या आंत जिरत होता. जाणून बुजून जरी नाही, तरी नकळत तिच्या भावाची तिच्याबद्दल जरा मत्सरी दृष्टि होती. असो. मधुकरच्या नापास होण्यामुळं उदासपणाचं वातावरण उत्पन्न झालं होतं तें थोडंसं घालवावं म्हणून कृष्णाने बोलतां बोलतां सहज बर्नार्ड शॉविषयी एक विधान केलं. आपलं इतर वाचन विविध आहे, ज्ञानार्जन आपलं ध्येय आहे—परीक्षा काय, मनांत आणलं तर सहज पास होऊं, असं

मधुकर भासवीत असे. त्याच्या टेबलावर कॉलेज लायब्ररी, सिटी लायब्ररी, वगैरे दोन चार लायब्र्यांमधून आणलेलीं दहा पांच 'मॉडर्न ऑथर्स' चीं पुस्तकं पसरलेलीं दिसायचीं. अर्थात् वादाची संधि तो सहजासहजीं जाऊं देत नसे. याही वेळीं तसंच झालं. अगदी पहिल्याच वाक्यापासून तो वादांत जोरांत शिरला. पुष्पाही पुढे झाली आणि तिच्या दोनचार वेचक प्रश्नांनी त्याचें 'ज्ञान' बाहेर पडलें. झालें. मधुकर चिडला. "ठाऊक आहे, बी. ए.ला पहिल्या सपाट्याला पास झालीस तें. म्हणूनच तूं आतांशा उर्मट झाली आहेस." एकदम तो बोलून गेला.

"हलकट आहेस झालं." तितक्याच चटकन पुष्पा बोलली. वादाला भलतीच दिशा लागूं नये म्हणून कृष्णा 'नेहमीप्रमाणे' मधे पडणार तों संतापाने अद्वातद्वा बोलून मधुकर बाहेर चालता झाला. "किती केलं तरी तो मोठा भाऊ आहे," दुसऱ्याची पत्नी झालेली सुलोचना पुष्पाला 'सत्रयीचं' बोलली. पुष्पाने कृष्णाकडे बघितलें. तो तिच्याकडे टक लावून बघत होता. शेवटचा पण नेहमीचा सहानुभूतीचा तो आधार या वेळीं तिला निर्विकार दिसला. अश्रूंनी चटकन तिच्या डोळ्यांत गर्दी केली. आणि नाकपुड्या थरथर कापायला सुरवात होतांच ती आपल्या खोलींत झपाट्याने निघून गेली.

कृष्णा तिच्या मागोमाग व्हरांड्यांत गेला. त्याचा चेहरा निर्विकार राहिलेला नव्हता. अंतर्यामींची कांही अवर्णनीय व अननुभूत खळबळ चेहऱ्यावर प्रतिबिंबित झाली होती. घडलेल्या प्रकाराचा, पुष्पाच्या वर्तनाचा तो विचार करायला जाई तों त्याच्या अंतर्मनांत खोल रुजलेले गतायुष्यांतील प्रसंग चलच्चित्रपटाप्रमाणे त्याच्या मनश्चक्षुसमोरून जात व त्यांच्यावरच त्याचे विचार स्थिर

होत. त्यांना झाडून नुकताच घडलेला प्रसंग तो निश्चयाने विचारास घेई, पण नकळत पुन्हां गतायुष्याचा विचार करूं लागे—

त्याच्या व सुलोचनेच्या लग्नांतली गोष्ट. अंतःपट बाजूस होऊन वधूवरांनी एकमेकांस पुष्पमाला घातली. अन् वधूच्या मागे हातांत कलश घेऊन उभ्या असलेल्या पुष्पाने, त्यांतल्या पाण्यांत पान बुडवून तें पाणी त्याच्या डोळ्याला लावलें. लावतांना गमतीने तिने पान जोराने डोळ्यावर दाबलें. कृष्णाने वर बघितलें-रागाने बघितलें—मधुर मिस्किलपणा तिच्या डोळ्यांत न्याचतांना त्याला दिसला—राग क्षणांत वितळला. स्वतःच्या डोळ्यांना झालेला स्पर्श व समोरची दृष्टि त्याच्या अंतर्मनांत खोल जाऊन बसली. उभयतांतही एकमेकाबद्दल अव्यक्त स्नेहभाव प्रगट झाला—

तिचा गणित विषय कच्चा होता. तिला वाटे, किंवा ठोंब्या विद्यार्थ्यांनी तिचा समज करून दिला होता, की गणित विषय आपल्याला यायचाच नाही. तिनंही स्वतः अनुभव न घेतां तिकडे दुर्लक्ष केलें होतें. कृष्णाने तिला गणित शिकविलें. तें आलें, तिचा पहिला नंबर आला—

"माझा पहिला नंबर आल्याबद्दल इतरांना आनंद वाटत असेल कदाचित; पण तुम्ही त्या विषयाची मला गोडी उत्पन्न करून दिलीत ही गोष्ट मी कधीही विसरणार...."—तिचा स्वर कंपित झाला. ती पुढे बोलूं शकली नाही. बोललेलें कृष्णाने ऐकलें—न बोललेलें तो विसरला नाही—

लग्नाला दोन वर्षं होत आलीं होतीं. एप्रिलच्या पहिल्या तारखेस कृष्णाच्या हातीं सकाळीं उजाडत एक पत्र पडलें. पुष्पाचें पत्र होतें. तिचें पत्र आलें की त्याला नेहमीच आनंद होत असे. घाईने त्याने तें पत्र फोडलें, पाहिलें—वाचलें अन् मोठ्याने हसला. त्यांत सुलोचना कृष्णाच्या नाकाला धरून ओढते आहे असें चित्र

काढून खाली 'एप्रिल फूल' म्हणून लिहिलें होतें. सुलोचनेने तें पत्र पाहिलें. ती रागावली. " लहान नाही, मोठं नाही बघायचं. अन् तुम्ही तिला प्रोत्साहन देतां." नवऱ्याविषयी सादर प्रेम, बहिणीच्या अल्लडपणाबद्दल माया इत्यादि गोष्टी तिच्या रागाच्या आविष्करणांत स्पष्ट दिसत होत्या. मुलीला उचलून ती तिला दूध पाजायला गेली. कृष्णा गंभीर झाला.

" उभयतांतलं परकेपणाचं अंतर या पोरीनं नकळत पण ताडकन् ओलांडलं खरं—ती माझी जिवलग मैत्रीण आहे हें आता नाकबूल करण्यांत काय अर्थ आहे ? " त्याने एकदम पत्राचें चुंबन घेतलें आणि " काय खुळी पोर ! " असें म्हणून तें पत्र टेबलाच्या खणांत जपून ठेवलें—

....एक ना दोन किती तरी गोष्टी त्याच्या मनश्चक्षूसमोरून भराभर जात होत्या. पण शेवटीं तो एकदम स्तब्ध झाला. " इथंच काय मूर्खासारखा मी उभा आहें ? तिला बिचारीला या वेळीं 'जाण' अंतःकरणाची गरज आहे." तो तिच्या खोलींत गेला. पुष्पा रडत होती. त्याने तिला हाक मारली. ती जास्तच रडूं लागली.

" पुष्पा-पुष्पा, ऐक मी काय म्हणतों तें. हं चूप-ऐक. " ती थोडी स्वस्थ झाली. तो बोलूं लागला. " पुष्पा, तुझे वडील या वेळीं जिवंत असते तर किती बरं झालं असतं. आई आहे, पण तिची ओढ या वेळीं साहजिकच मधुकरकडे जाणार-तो नापास झाला आहे ना ? " पुष्पा आणखी स्तब्ध झाली. तो आणखी बोलूं लागला, पण त्याचा आवाज स्थिर राहिला नव्हता. " पुष्पा, खरं सांगूं ? स्वतःच्या अगदी उदात्त आणि पवित्र भावना जर कोणाला बोलायला कठीण जात असतील तर तें बायकांपेक्षा पुरुषांनाच. तुला राग येईल, पण आम्ही पुरुष बायकांच्या बोलण्याविषयी जितकं बौद्धिक औदार्य आणि योग्य समज दाखवतों तितका

बायका पुरुषांविषयी खास दाखवत नाहीत. जणू काय जन्मापासूनच पुरुषांच्या विषयी गैरसमज करून घेण्यास तुम्ही टपलेल्या असतां. आणि एखादा पुरुष स्वतःची जबाबदारी ओळखून ' भाषा ' वापरूं लागला तर तुम्ही ' बकिली भाषा ' म्हणून त्याला डवचण्याला तयारच."

" मी कधी बरं असं वागलें ? " तिला पुन्हा हुंदका येत होता.

" छे. छे. तुझ्या बाबतींत तसं झालं म्हणून नव्हे, पण— जाऊं दे—स्पष्टच सांगतों—पुष्पा तुला अन्याय होतो आहे, तुला कोणी समजून घेत नाही. तुझी लायकी आणि हक्क असून केवळ परिस्थितीमुळं तुझं कौतुक होत नाही. यामुळे तुझा एकसारखा कोंडमारा झाला आहे हें मला दिसतं." तिने आश्चर्याने वर पाहिलें. " पुष्पा मी जास्त कांही बोलत नाही, पण मला तुझ्याविषयी अभिमान वाटतो." तो थोडा थांबला—स्वतःचा आवाज अधिकच अस्थिर झाला आहे असें त्याला वाटलें.

" हें पहा, मधुकरविषयी तूं जास्त विचार करूं नकोस. तुझ्यांत व बाकीच्यांत मनोवृत्तीचं एकप्रकारचं अफाट अंतर आहे, हें तुला दिसत नाही. दुसऱ्यावर वजन पाडण्याकरतां तो आपल्याला सर्व समजतं आहे असं दाखवायला जातो, पण प्रत्येक क्षणीं तो कांही तरीच बोलत असतो. तूं ज्या भूमिकेवरून बोलतेस ती भूमिका समजण्याची त्याच्यांत पात्रता नाही, ही वस्तुस्थिति तुझ्या लक्षांत येत नाही. कारण तुझ्यांतही एक तऱ्हेचा 'बौद्धिक उतावळेपणा' येत चालला आहे."

तिने पुन्हा एकदा आश्चर्याने वर पाहिलें.

" माझं ऐक—वाद करणं सोडून दे. त्याची पात्रता समजून वाग, अन् परिस्थिति सुधारते की नाही तें बघ. 'योग्य समज' ठेवून तुझं कौतुक करणारीं माणसं आहेत. कळलं ? अन् लक्षांत ठेव,

God, books and good actions;
Your true friends to lift you up."

अर्थपूर्ण शांतता दोघांमधे पसरली होती.

थोड्या वेळाने तो म्हणाला, "आपल्याला कुणी जाणत नाही म्हणून अशी रडत नाही ना बसणार पुन्हा?"

तिने वर पाहिलें-रडतांना ती किंचित् हसली-खाली पाहूं लागली.

"किती चांगली आहेस." म्हणून अतिशय कळवळ्यानं पण अगदी सहज त्याने तिच्या दंडावर हळूच आपला डावा हात ठेवला. पण झटकन् तो काढून घेऊन तो बाहेर गेला.

खोलीबाहेर तो १०-१९ सेकंद उभा राहिला. त्याचा हात कापत होता. तो झपाट्यानं तेथून निघून गेला. स्वैपाकघरांत जाऊन त्यानं हळूच चुलींतले दोन निखारे काढले आणि आपल्या डाव्या हातावर दोन मिनिटें ठेवले. नंतर व्हरांड्यांत येऊन तो शांतपणें फेऱ्या घालूं लागला.

पुष्पानं दंडाकडे निरखून पाहिलं—एकदम तिनं आपला दंड जोरानं चावला—"माझ्याविषयीं इतकं बारीक सारीक यांना कसं समजतं? खरंच इतकं पूरेपूर कसं समजतं?" असं म्हणून ती एकसारखी रडूं लागली. थोड्या वेळांत तिनं वर आरशांत बघितलं. हात जोडले "देवा, देवा—तो माझा आहे. देवा, तूंच एक जाणतोस-तो माझा आहे—नी आतां मला कळलं-पुरेपूर पटलं-मी त्याची, त्याचीच आहें," तिनं देवाला नमस्कार केला. ती एकदम मोठ्यानं हसली आणि खोलीचा दरवाजा उघडून "मधू मधू" म्हणून हाका मारीत भावाच्या खोलींत शिरली. तो तिथे नव्हता. एका कागदावर घाईनं "मला क्षमा कर" असं तिनं

लिहून ठेवलं– "ताई ताई" म्हणून हाका मारीत ती झपाट्यानं येऊन बहिणीसमोर उभी राहिली व तिचा गाल पटकन ओढून घेऊन त्याचे तिने पटापटा ४-५ मुके घेतले आणि एक शब्द न बोलतां तिथून धावत मागील दारीं गेली. सुलोचना भांबावली. तिला विलक्षण वाटलं. मुलीला खाली ठेऊन तीही पुष्पाच्या मागे गेली. पहाते तों चिंचेच्या प्रचंड वृक्षाला बांधलेल्या सुंभाच्या दोरीच्या झोपाळ्यावर उभी राहून ती जोरजोरानं झोके घेत आहे. ही असं अंगांत आल्यासारखं काय करते आहे असं सुलोचनेला वाटून ती घाबरली—तिनं घाईनं कृष्णाला तिथं आणलं. त्या दोघांना पाहतांच ती आणखी जोरानं झोके घेऊं लागली. इतके की जरा हिचा हात ढिला पडला तर कपाळमोक्षच होईल, म्हणून भीतीनं "अहो तिला थांबवा" असं सुलोचना एकसारखं कृष्णाला ओरडून सांगूं लागली. तिचं ओरडणं ऐकून पुष्पा मोठमोठ्यानं हसूं लागे व आणखी जोरानं झोके घेई.

"हें पहा-तिची काळजी करूं नकोस तूं. आंत जाऊन आधी चहा कर बरं–मी येतों तिला घेऊन. जा लवकर–जा." कृष्णाचा हुकमी आवाज ऐकून सुलोचना आंत गेली. तो पुष्पाकडे शांतपणें पाहूं लागला. ती जोरानं झोके घेत होती. पण तो तिला एक शब्द न बोलतां "हा कड असाच थोडा उताला जाणं जरूर आहे" असं स्वतःशींच पुटपुटून तो आणखी शांतपणे तिच्याकडे पहात राहिला. ती वरमली. तिनं झोके घेणं हळूहळू बंद केलं. केस मोकळे होऊन सैरावैरा उडत आहेत, कपाळावर घाम आलेला आहे, श्वासोच्छ्वास जोरानं चालू आहे, गाल लाल झाले आहेत, अशा स्थितींत ती त्याच्यासमोर येऊन उभी राहिली. "तुम्ही कां नाही मला झोके घेऊं नकोस म्हणालांत?" असा प्रश्न तिच्या एकंदर अविर्भावांत स्पष्ट दिसत होता.

" पुष्पा, चहा घ्यायला चल " एवढंच किंचित् हसून तो म्हणाला. तिनं दचकून वर बघितलं—कृतज्ञता तिच्या डोळ्यांत चमकूं लागली. तो पाठ फिरवून चालूं लागला. " मला चहा हवा आहे. खरंच की, मला केव्हा—काय पाहिजे हें यांना कसं पटकन कळतं ! " असं स्वतःशींच म्हणत ती त्याच्यापुढे धावत गेली. सुलोचना स्टोव्हवर चहाचें आधण चढवीत होती. तिला पुष्पानं जोरानं बाजूला केलं. आधणांत ५-६ कप आणखी पाणी ओतलं आणि जोरजोरानं पंप करूं लागली.

"झालं आहे तरी काय तुला ?" सुलोचना म्हणाली. पुष्पानं तिकडे लक्षच दिलं नाही. तिनं चहाची सर्व तयारी केली. पाट मांडले. चहा गाळून तिनं एक कप कृष्णापुढे ठेवला, एक आपण घेतला नि एक सुलोचनेसमोर केला. कृष्णाचा आणि स्वतःचा पेला रिकामा झाला की तिनं तो पुन्हा भरावा—त्यानं व तिनं तो प्यावा—असं चार वेळा झालं. सुलोचनेनं तिच्याकडे पाहिलं, पण एक शब्द बोलायची तिची छाती झाली नाही. चौथा कप मुकाट्यानं पिऊन कृष्णानं डाव्या हातानं सहज बशी खाली ठेवली, तों सुलोचनेचं त्याच्या हातावरील फोडाकडे लक्ष गेलं. तिनं घाबरून विचारलं. सिगरेटनं हात भाजला म्हणून त्यानं सांगितलं. पुष्पानं एकदा निरखून त्याच्याकडे पाहिलं. ती मुकाट्यानं उठली. एक पांढरा स्वच्छ रुमाल तिनं आणला. टिंक्चर आयोडिन त्या हातावर तिनं ओतलं व रुमालानं तो बांधला.

मधूकडून दवाखान्यांतून सुलोचनेनं ड्रेसिंगचं सामान आणवलं. पुष्पानं तिला पुन्हा बाजूला केलं आणि स्वतः ड्रेसिंग करूं लागली. सुलोचना रागावली. " तुला हें ड्रेसिंग साधायचं नाही ताई." एवढंच तिनं शांतपणं उत्तर दिलं. ड्रेसिंग करतांना कृष्णाचा उजवा हात कापत होता. " असे हात कापलेले मला आवडत

नाहीत." पुष्पा ठासून म्हणाली. घडयाळ जसं एकदम बंद पडावं तसं कृष्णाचं हात कापणं जें एकदम बंद झालं, तें ड्रेसिंग बंद होईपर्यंत कांही पुन्हा दिसलं नाही.

—२—

कृष्णा + + + प्रायव्हेट हायस्कूलवर हेडमास्तर होता. तो फर्स्ट क्लास एम् ए. होता. हुशार होता. कॉलेजमधली त्याची ख्याति ऐकून व त्याची धडाडी पाहून खाजगी संस्थेला असाच कर्णधार पाहिजे म्हणून त्याला एकदम हेडमास्तर केलं होतं.

तो व सुलोचना रजा संपतांच आपल्या घरीं जायला निघाली. स्टेशनवर तिकिटं काढण्यासाठी कृष्णानं पाकिटांतून नोट काढली. नोटेबरोबर एक लहानसं चिटोरं बाहेर आलं. "उगीचच हात भाजायची सवय वाईट." एवढंच त्यांत लिहिलं होतं.

—३—

पुष्पानं एम्. ए. ला समाजशास्त्र घ्यायचं ठरवलं. तिनं पुस्तकं जमा केलीं आणि अभ्यासाला सुरवात केली. कृष्णा व सुलोचना गेल्यावर स्टेशनवरून घरीं येतांच एका खरडयावर तिनं खालील ओळी लिहिल्या व तो खरडा आपल्या कॉटच्या समोरच्या भिंतीवर सकाळीं उठतांच व रात्रीं निजतांना सहज दिसेल अशा जागीं लावून ठेवला.

God, books and good actions,
Your true friends to lift you up.

रोज उठल्यावर व निजतांना ती या ओळी वाची. "देवा, तूं सर्व जाणतोस-तुला मी सर्वस्वी शरण आहें," एवढीच प्रार्थना ती सकाळ संध्याकाळ करी.

अभ्यासाव्यतिरिक्त ती Ibsen व Russel यांना मनापासून आपला सोबती करी. नाही तर मागील दाराच्या झोक्यावर मूर्च्छा येईतों झोके घेई.

घरांतली तिची वागणूक बदलली. तिनं वाद करणं सोडलं. पण ती मूकस्तंभ राहून उगीच औदासीन्यही पसरवीत नसे. मनोरम गप्पा मारण्यांत ती पटाईत झाली. मधुकरची खोली झाडणं –रोजच्या रोज त्याचे कपडे टेबल वगैरे व्यवस्थित ठेवणं, त्याचं चहापाणी बघणं, ती स्वत: करी. अगदी आवडीनं करी. सहा महिन्यांत मधुकर तिचा दास झाला. तो आपल्या अभ्यासांतल्या अडचणी तिला विचारूं लागला.

"पुष्पा, तुला इतकं सगळं अन् इतकं चांगल्या रीतीनं करून अभ्यासाला वेळ भरपूर मिळतो याचं कारण, तूं जें कांही करतेस तें मनापासून असतं; नी तुला योग्य वेळीं योग्य गोष्टी अगदी अचूक सुचतात." एकदा तो तिला म्हणाला.

एक वर्ष गेलं. उन्हाळ्याच्या सुट्टींत कृष्णा नेहमीप्रमाणं सासुरवाडीस गेला नाही. युनिव्हर्सिटीचे पेपर्स तपासायचे आहेत असं तो म्हणाला. दुसऱ्या वर्षीं तसंच. अर्थात सुलोचनाही जाऊं शकली नाही. दोन वर्षांत त्यांच्या भेटी नव्हत्या. पुष्पा तिला वारंवार लांबलचक पत्र लिहीत असे. त्यांत तिच्या वाचनांतल्या गोष्टी, जगाचे अनुभव सर्व कांही यायचं. तिला सर्वच नीट समजत नसे. कृष्णाकडून ती समजावून घेई. एक दोनदा ती म्हणाली, "किती हुशार आहे! हिचं लिहिणं समजलं तर क्षणभर मनुष्याला उच्च वातावरणामध्ये गेल्यासारखं वाटतं. हिला नवरा कसा मिळेल कुणास ठाऊक!"

"तूं कां काळजी करतेस तिची? अशा मुलींना नवरा शोधायला जावं लागत नाही." कृष्णा म्हणाला. एके दिवशीं कृष्णाला

पुष्पाचं पत्र आलं. दोन वर्षांत हें पहिलंच पत्र होतं व त्यांत फक्त खालील मजकूर होता.

"सत्याला वर मान करून तोंड देण्याची पात्रता अंगीं आणणं हेंच खऱ्या शिक्षणाचं अंतिम ध्येय असायला पाहिजे. मी एम्. ए. ची सर्व तयारी केली होती. पहिल्या वर्गांत मी येईन अशी माझी खात्री होती.

"परीक्षेला आता मी बसत नाही.

"रसेलप्रमाणं आपला दर्जा न सोडतां धडाडीनं सत्य सांगण्याची पात्रता माझ्या अंगीं येईल का ?

पुष्पा."

—४—

सुलोचनेला मुलगा झाला. बारशाकरतां तिनं बहीणभावांना अतिशय आग्रहानं बोलावलं. मधूची एल्एल्. बी. ची परीक्षा जवळ आली होती. पुष्पानं येऊं शकत नाही म्हणून प्रथम कळवलं. बारशाच्या दिवशीं सकाळीं ती दत्त म्हणून उभी राहिली. बारसं थाटानं आणि उत्साहानं झालं. त्या बारा तासांत सुलोचनेचं आपल्या मुलाबाळांशीं व खुद्द स्वतःशीं वागणं पाहून "आमची आई गेली, तरी ताई जिवंत आहे तोंवर आई नाही असं कांही मला वाटायचं नाही." असं पुष्पा स्वतःशीं म्हणाली. दुपारीं मुलाला पाळण्यांत घालायचा समारंभ आटोपला. सुलोचना मुलाचे कपडे आवरीत होती. नांव ठेवण्याकरतां जमलेल्या बायका आपापल्या घरीं गेल्या होत्या. पुष्पा कृष्णाच्या खोलींत खिडकीशीं उभी राहून बाहेर पहात होती. कृष्णा शाळेंतून आला. कपडे काढतां काढतां तो म्हणाला, "आटोपला का बायकांचा गोंधळ?"

पुष्पानं मान फिरवली नाही, उत्तरही दिलं नाही. तो तिच्याकडे पांच मिनिटं पहात उभा राहिला.

"पुष्पा !"—

"माझं तुझ्यावर प्रेम आहे. तूं माझा आहेस." एकदम वळून त्यांच्याकडे पहात ती निश्चयाने म्हणाली.

"मला माहीत आहे." तिच्याकडे निश्चल दृष्टीनं पहात त्यानं उत्तर दिलं.

"तुझंही माझ्यावर प्रेम आहे. मीही तुझी-तुझीच-आहें." एकेरी नांवानं संबोधल्यावरून तो चकित झाला होता. पण तसाच पहात राहिला.

"ऐकलं ? तुझंही माझ्यावर प्रेम आहे." ती पुन्हा ठासून म्हणाली.

"मला सांगतां येत नाही." खुर्चीवर बसत तो म्हणाला.

"भ्याड कुठला" ती जोरानं म्हणाली. तीव्रतेनं त्याच्याकडे पाहूं लागली.

"काय म्हणालीस ?" पुन्हा उठून त्यानं जोरानं प्रश्न केला.

"भ्याड ! एकदा नव्हे हजारदा भ्याड." तितक्याच जोरानं तिनं उत्तर दिलं. क्षणमात्र दोघं एकमेकांच्या डोळ्यांत बघत होतीं. कृष्णानं एक दीर्घ श्वास सोडला. एकदम एक दोन पावलं तो पुढे झाला.

"पुष्पा, ऐक. ईश्वरसाक्ष मी सत्य तेंच सांगितलं. सत्य समजून घेऊन त्याला वर मान करून तोंड देण्याचा मीही थोडा-बहुत अभ्यास केला आहे. तुझ्याविषयीच्या माझ्या भावना काय आहेत तें मला कळतं. पण काय करूं ? "पुरुष हा सखोल आणि

सतत प्रेम करूंच शकत नाही" हें जगांत अनुभवास आलेलं सत्य माझ्या डोळ्यासमोर उभं राहतं—माझ्या डोक्यांत अन् अंत:करणांत एकच गोंधळ होतो. 'देवा, मला शाश्वत सत्य दाखीव-कितीही कटु असलं तरी तें पाहण्याची माझी तयारी आहे,' अशी रोज कळवळून मी प्रार्थना करतों. माझा गोंधळ अद्याप कमी होत नाही. सत्याचं दर्शन अद्याप मला दिलं जात नाही." तो थांबला. त्याच्या आविर्भावांत प्रामाणिकपणा ओतप्रोत भरला होता.

"ऐक आता मी काय म्हणतें तें. तुम्ही पुरुष बुद्धिप्रधान आहांत. तेव्हा असेच हाल भोगा. आम्हा बायकांचा आमच्या भावनेवर विश्वास असतो. श्रद्धा असते. माझ्यावर तुझा विश्वास आहे का ? खरं तें सांग."

"आहे." चटकन पण विश्वासपूर्ण मुद्रेनं तो म्हणाला.

"मग विश्वास ठेव—तुझं माझ्यावर प्रेम आहे. मी तुझी आहें."

त्यानं तिच्या डोळ्यांत निरखून बघितलं. क्षणमात्रही तिची पापणी हलली नाही.

"माझं तुझ्यावर प्रेम आहे. मला कबूल आहे." तो खुर्चीवर बसला.

"मग चल तर माझ्याबरोबर." पुढे होऊन ती तीव्रतेनं म्हणाली.

"कुठे ?" एकदम अर्धवट उठून त्याने प्रश्न केला.

"जिथं या प्रेमशून्य ढोंगी वातावरणापासून आपल्याला दूर राहतां येईल तिथं."

"पुष्पा—?—"

"ऐक, तुझ्या—ताईच्या—मुलाचं बारसं आज मी पाहिलं. माझे विचार मला असह्य झाले. ढोंगी—प्रेमशून्य जोडप्यांच्या प्रजेची

राष्ट्राला गरज नाही. खऱ्या प्रेमपूर्ण मीलनापासून उत्पन्न होणाऱ्या तरुण पिढीची त्याला गरज आहे. त्याच्यांतच त्याचा उद्धार आहे. हें राष्ट्रकार्य जरूर पडल्यास विवाहाचीं बंधनं झुगारून देऊनही प्रेमी स्त्रीपुरुषांनी करायला पाहिजे. जगाला मी अमानुष दिसेन. पण मी बोलतें तें सत्य आहे. त्याला तोंड देण्याची तुझी तयारी आहे?"

"आहे."

"मग चल तर माझ्याबरोबर."

"चल." तो ताडकन् उठला. खुंटीवरची कोट टोपी त्यानं जोरानं ओढली. त्याचा निश्चय पाहून ती एकदम मागे होऊन टेबलाला टेकली. सबंध संभाषणांत तिची नजर पहिल्यांदाच खाली गेली.

"पुष्पा—मी तयार आहें."

"बायकोची आणि मुलांची व्यवस्था?—"

"हं. खऱ्या प्रेमाची जर परमेश्वराला किंमत असेल तर तो घेईल त्यांची काळजी."

खोलीमधे एकाएकी शांतता पसरली.

"थांब, मी आलें." असं म्हणून ती झपाट्यानं बाहेर गेली. दोन मिनिटांत ती परतली. एका टॉवेलामधे लुगडं नी पोलकं गुंडाळलेलं लहानसं गाठोडं तिच्या हातीं होतं.

"मी एकटीच जाणार." ती त्याच्याकडे पहात म्हणाली. तिची मुद्रा विजयी होतीसं दिसत होतं. एकटी कां जाणार, कुठं जाणार, सुलोचनेला काय वाटेल, वगैरेपैकी एकही प्रश्न त्यानं तिला विचारला नाही. तोही तिच्याकडे पहात होता. त्याची नजर भेदक परंतु प्रेमळ होती. 'जें समजायचं तें मी समजलों' असंच जणू काय डोळ्यांतील भाव दर्शवीत होता.

क्षणमात्र वाट पाहून ती झटकन मागे वळली आणि झपाट्यानं दृष्टीआड झाली. त्यानं तिला थांबवलं नाही. परतवलं नाही. आंत सुलोचनेच्या खोलींत जाऊन तान्ह्या मुलाचा 'अतिशय आदरानं' त्यानं एक पापा घेतला. सुलोचनेच्या प्रेमपूर्ण नजरेकडे बघून नांव काय ठेवलं म्हणून त्यानं प्रश्न केला.

"विजय" खाली पहात तिनं उत्तर दिलं.

—५—

थोड्या वेळानंतर त्यानं पुष्पाची सहज चवकशी केली.

"म्हणजे? बाहेरच नाही का तुम्हांला दिसली?" सुलोचना म्हणाली.

"नाही. मी हा आताच शाळेंतून आलों." कृष्णा चटकन म्हणाला.

तिची चौकशी सुरू झाली. संध्याकाळ झाली, तेव्हा चौकशीच्या कामाला जोर चढला. आंतल्या खोलींतल्या टेबलावर एक चिठ्ठी होती. कृष्णानं ती सुलोचनेला दिली. "ताई, मी एकाएकी घरीं परत जात आहें. का जात आहें तें मी कुणालाच सांगणं शक्य नाही. मात्र माझ्या जाण्याशीं माझा एकटीचाच संबंध असल्यामुळे त्यासंबंधी कोणीही तर्क करूं नयेत, एवढीच विनंती आहे." सुलोचनेच्या डोळ्याला खळ्कन पाणी आलं.

—६—

वरील गोष्टीला आणखी तीन वर्षं झालीं. पुष्पानं Nursing & Midwife चा कोर्स घेतला व त्यांत ती निष्णात झाली. तिची हुशारी व स्वभाव पाहून दीनदयाळ हॉस्पिटलच्या अधिकाऱ्यांनी तिला मेट्रन केली होती. सुलोचना तिला भेटायला दोनदा गेली होती. लग्नाचा विषयही तिनं काढला होता. ती चूप बसे. नुक्तंच या

विषयावर तिनं पुन्हा एकदा पुष्पाला पत्र लिहिलं. त्याचं उत्तर कृष्णाला पुढीलप्रमाणे आलं.

**खाजगी.**

नमस्कार वि. वि. किश्या, ताईचं मला लग्नाबद्दल पत्र आलं. काय मी तिला उत्तर देऊं ? मला या जन्मीं लग्न कर्तव्य नाही असं तिला मी शेवटचं सांगणार आहें. किश्या, काय करूं ? कित्येक वेळा जगाचीं सर्व-सर्व बंधनं ताड्ताड् तोडून तुला तिथून घेऊन यावंसं वाटतं. माझ्या स्वतःवरून तुझ्या हृदयाच्या तिथे होत असलेल्या यातना मला कळतात. आपलं प्रेम कळल्यावर घमेंडखोर वृत्तीनं माझ्याकडे पाहणारी माझी ताई आहे असं जर मला वाटतं तर, बहीणभावंडाचं नातं पायाखाली तुडवून, तिच्या डोळ्यादेखत तुझ्या हाताला धरून मी तुला घेऊन आलें असतें. मला ठाऊक आहे, माझी ताई न्यायी आहे. आपलं एकमेकांवरचं प्रेम तिला कळलं तर क्षणाचीही वाट न पाहतां मला 'माझी हक्काची' जागा ती रिकामी करून देईल. आणि म्हणूनच तिला दुखवावं असं क्षण-मात्र मला वाटत नाही.........मला विकार नाहीत असं कसं होईल ? तुला कडकडून भेटावं असं मला 'किती-कसं आणि किती प्रकारानं' वाटतं, याची पुरेपूर कल्पना फक्त तुलाच येईल. त्या दिवशीं तुझ्या घरीं स्वतःचं प्रेम तूं कबूल केलंस, माझ्याबरोबर यायला तयार झालास—बस, यांतच खऱ्या प्रेमाचा 'विजय' आहे. या विजयानंदाच्या आधारानं विकारांची सर्व खळबळ मी माझ्या ताब्यांत ठेवूं शकतें-पुढेही ठेवीन अशी मला घमेंड आहे. तुझ्या विषयीचं माझ्या हृदया-तलं प्रेम ही 'ईश्वरी देणगी' आहे. त्या देणगीला स्वार्थांधतेनं मी भ्रष्ट होऊं देणार नाही......माझ्या हृदयांत प्रेम उत्पन्न झालं – देवाचे किती उपकार मानूं ! '*It is better to*

*have loved and lost' etc.* या वाक्याचा अर्थ मला जसा कळतो व वकतो तसा कुणालाच—आऊं या ......माझ्या प्रेमाचं मूर्त स्वरूप तुला पाह्यचं असेल तर गुपचुप आमच्या हॉस्पिटलमधे दोन दिवस येऊन रहा. येथील प्रत्येक रोगी-माझ्या हातखालच्या नर्सेस, नोकर, सर्वजण मला 'आई' म्हणून हाका मारीत असलेले तुला दिसतील. का मी माझ्या प्रेमाबद्दल अभिमान बाळगूं नये ?.........किश्या, मी तुला एकेरी नांवानं हाक मारतें—पण खरं सांग, तुझं आणि माझं नातं बरोबरीचं नाही का ! एक कवि म्हणतो त्याप्रमाणें 'नांवांत काय आहे ?' असं जग विचारील. पण तूंच सांग—नांवांत कांही आहे का नाही ? एकदा मी तुला 'किश्या' म्हटल्यावर आता कृष्णराव म्हटलेलं तुला आवडेल कां ?......अन् हें पहा, मी तुला वर नमस्कार लिहिला आहे. तूंही मला पत्रांतून नमस्कारच लिहिला पाहिजेस. आशीर्वाद वगैरे लिहून मला कमीपणा तूं आणूं नकोस. **नमस्कार लिही.** आणि जर का आशीर्वाद लिहिलास तर या जन्मीं मी तुझं तोंड पाहणार नाहीं. मी प्रेमळ आहें तितकीच स्वाभिमानी आहें; समजलं का ?,........सुलोचनेशीं तुझा आजपर्यंत चाललेला ढोंगीपणा जर तूं यशस्वी रीतीनं जन्मभर चालवून दाखवलास तर परमेश्वर तुला *V. C.* देईल. माझ्या प्रेमाच्या आधारावर मी विकारांची खळबळ थोपवून धरूं शकतें—अंतःकरणांतील माझ्या विषयीच्या प्रेमाच्या आधारावर हा ढोंगीपणा जन्मभर सोसण्याची तुला परमेश्वर शक्ति देवो अशी त्याचे चरणीं माझी प्रार्थना आहे......... माझं हें सगळं लिहिणं जगाच्या दृष्टीला चुकून पडलं अन् जर का जगानं माझा उपहास केला, तर, सांगून ठेवतें, त्याच क्षणीं मी तुझ्यासमोर येऊन उभी राहीन आणि जगाच्या नाकावर टिचून तुला माझ्याबरोबर घेऊन जाईन. 'अमानुष स्त्री' म्हणून जग माझ्या नांवानं डांगोरा पिटील हें मला माहीत आहे. त्या

वेळीं जगाला उलट कोणत्या शिव्या द्यायच्या याची यादी माझ्याजवळ तयार आहे.........बरं नमस्ते........

सर्वस्वी तुझीच
प्रेमळ पत्नी

कृष्णानं तें पत्र दहादा वाचलं. तो हसला-रडला-नंतर शांत झाला. त्यानं उत्तर लिहिलं.

अनेक आशीर्वाद वि:—मी तुला आशीर्वाद लिहिला. नांवांत सगळं आहे असं माझंही मत आहे. आशीर्वाद लिहीत असतांना मला काय वाटतं, हें फक्त तुलाच कळेल. पुष्पा, तुझं पत्र बघितल्यावर मला एकच वाक्य लिहावंसं वाटलं. "चि. पुष्पास देवाचे अनेक आशीर्वाद."

तुझा
किश्या

ता. क. आम्हांला कालच एक नवीन मुलगा झाला. बाळ बाळंतीण खुशाल आहेत.

त्यानं अंगावर कपडे चढवले. पत्र पोष्टांत टाकायला तो स्वत: गेला. वाटेंत एकसारखा एकच शब्द त्याच्या डोक्यांत थैमान घालीत होता—'अमानुष स्त्री!' पत्र पोस्टांत टाकलं आणि एकदम तो स्वत:शींच म्हणाला 'अमानुष की अतिमानुष!'

---

# ३ शाल

" किती विलक्षण गार वारा आहे हा. मला वाटतं ही दुसरी cold wave च आली आहे. छळणार चांगली ८-१५ दिवस आता मुंबईकरांना." असें म्हणत श्रीधरने समोरची खिडकी लावून घेतली.

" ती पश्चिमेकडचीही लावा बाई! तिकडनंच जास्त वारा येतोय." श्रीधरचा कोट सूटकेसमधे ठेवीत विमल म्हणाली. श्रीधरने खिडकी लावली तोंच दारावर थाप ऐकूं आली.

विमल एकदम उठली—जणू काय तिलाच कोणी प्रत्यक्ष हाक मारीत आहे, अशा विश्वासाने ती उठली व तिने घाईने दार उघडलें. दार उघडीतों ती वर बघत होती. दार उघडून उंबरठ्यावरील व्यक्तीला बघतांच तिची मान खाली गेली. ती परत फिरली व सामान लावण्यांत लक्ष गुंतवूं लागली.

" कोण वामन ?' एखादे वेळीं सूर्य उशिरा उगवेल पण तुझं येणं चुकावयाचं नाही. आता ९॥ होऊन गेले–आम्हांला वाटलं रात्रीच्या या गार वाऱ्यांत तूं कांही येणार नाहीस. एखादे दिवशीं

शिकवणी चुकली तर ही काय जी. ए. व्हायची राहीले होय? एवढया गारठयांत कशाला त्रास घेतलास?"

"अन् एवढया गारठयांत प्रवासाला निघण्याची तरी कुणाला हौस सुचली?" वामनच्या आवाजांत किंचित् कंप होता—उत्तर ऐकण्याची आतुरता चेहऱ्यावर होती. विमल व श्रीधर यांच्याकडे तो आलटून पालटून बघत होता.

"त्या अकोल्याच्या एका जिनिंग फ्याक्टरींत आग लागली काल—जरा थोडी भानगड उपस्थित झाली आहे, म्हणून त्या क्लेमच्या बाबतींत चौकशी करण्याकरतां कंपनीनं जायला सांगितलं आताच. एक महिन्यांत कुठं बाहेर जावं लागलं नाही. अन् आता आजच या गारठयांत प्रवास करायचा म्हणजे—"

"तुम्हा विमा कंपन्यांतल्या लोकांचं हें असंच. एक दिवस कांही निश्चिति नाही एकाच ठिकाणीं रहायची."

"खरंच तें. आणि आता जायचा इतका कंटाळा आला आहे—हें काय? अग, दोन दिवस बाहेर गांवीं जायचं त्याला इतकं सामान कशाला? तूं काय माझी महिनाभर रवानगी करण्याच्या विचारांत आहेस की काय? बाकी खरंच, नवरा बायकोंनी मधून मधून महिना पंधरा दिवस दूरच राहिलेलं बरं असतं. वियोगांतच प्रेम वाढतं आणि माणसं नंतर नव्या प्रेमानं एकमेकांजवळ येतात. खरं की नाही मित्रा?"

श्रीधर मोठयानं हसला. आपल्या बोलण्यांतील भावनेला प्रत्युत्तर मिळण्याच्या तीव्र इच्छेने विमलकडे त्यानं बघितलं. तिच्या डोळ्यांतून टपटप अश्रू पडतांना दिसले.

"हे काय, रडायला काय—अग थट्टा ती." त्याने तिच्या डोक्यावरून प्रेमातिशयानं हात फिरवला. त्याच्या हाताचा स्पर्श होतांच तिला जोराचा हुंदका आला.

कां कोणास ठाऊक, पण वामनचं शरीर कापत होतं. स्वतःला स्थिर ठेवण्यासाठी त्याला खुर्चीचा आधार घ्यावा लागला.

श्रीधरच्याही डोळ्यांत दुःख दिसत होतं. विमलला त्यानं उठवून हळूच जवळच्याच पलंगावर बसवलं व तो स्वतः सामान भरूं लागला. वाऱ्याच्या झोतानं खिडकी उघडली—गार वारा आंत आला.

" आज गेलं नाही तर नाही का चालणार ? " प्रश्न करीत ती चटकन उभी राहिली.

" म्हणजे ? काम केलं नाही तर पोट कसं भरेल ? जाऊं दे मला. चांगला ५०–७५ रुपये भत्ता मिळेल. तुला तें चंदेरी पातळ घ्यायचं आहे ना ? "

" पण "—

" पण काय ? हें पहा, तसं पाहिलं तर, काय असेल तें असो, मलाही आज जावंसं वाटत नाही. पण माणसानं थोडं व्यवहारी बनलं पाहिजे. या असल्या बेकारीच्या काळांत तर आहे त्या नोकरीलाच विशेष संभाळलं पाहिजे माणसानं. खरं की नाही वामन ? मला जायला हवं की नको ? अगदी निःपक्षपातपणे सांग हं. "

" तसं म्हणजे या दिवसांत इतके पैसे मिळणं म्हणजे जरा कठीणच–पण या असल्या—" त्याचा आवाज एकदम घोगरा झाला.

" हें काय, तुम्ही दोघांनीही भावनेच्या आहारीं जाण्याचा कट केला आहे की काय ? ही अशी अन् तूंही—"

" तसं नाही—पण हा बाहेर असा गारठा–म्हणजे एक महिना झाला मुंबईंत राहून. जायला तर अगदी— "

"पाहिजेच. होय ना ? अगंदी बरोबर बोलत होतास. अरे गारठा असला तर चार गरम कपडे बरोबर घेईन. हा स्वेटर नी

गरम कोट आहेच. अन् हो-विमल, ही तुझी शाल घेतों बरोबर, तुझी आवडती आहे ही अगदी. ती बरोबर असली म्हणजे काय बिशाद आहे थंडी वाजायची." त्याने पलंगाच्या काठावरची शाल झटकन् उचलली व आपल्या अंगावर घेतली. कशी दिसते म्हणून त्यानं एकदा समोरच्या आरशांत सहज बघितलं.

"खरंच, किती छान दिसते माझ्या अंगावर! इतके दिवस तूं एकदाही मला वापरूं दिली नाहीस. मला चांगली दिसते म्हणून मी बळकावून बसेन असं हिला वाटत होतं बरं का? दुसऱ्या कोणी हात लावलेला हिला खपत नाही." त्यानं पुन्हा एकदा आरशांत पाहिलं.

"बाकी वामन, आपण कबूल करतों बुवा-या वेळची तुझी ही भाऊबिजेची ओवाळणी छानच आहे. किती मऊ सुरेख आहे ही. किती Protection वाटतं अंगावर असली म्हणजे. मला आता कळलं हिला ही शाल इतकी कां आवडते. बस्, इतके दिवस अगदी हात लावूं देत नव्हतीस मला-आता आपण ही बळकावणार— खरंच किती Protection वाटतं." त्याने पश्चिमेकडची खिडकी एकदम उघडली. जोराचा गार वारा आंत आला.

"खरंच किती Protection वाटतं या शालींत, बघ तर वामन." त्यानं आपल्या अंगावरची शाल त्याच्या अंगावर घातली. पण तिचं टोक धरून ठेवलं. वामन ती स्वतःच घेईल अशी त्याला भीति वाटली की काय कोण जाणे.

"खरं की नाही मी म्हणतों तें" असं म्हणून वामनच्या उत्तराची वाट न पाहतां त्यानं ती शाल पुन्हा आपल्या अंगावर घेतली.—

"बस् ही आपण आर्ज घेणार. तूं घाबरूं नकोस. हा तुला यापेक्षा किती तरी चांगली-अमोल देणगी देईल. आहेच त्याचं

आपल्या बहिणीवर तसं प्रेम. अन् आता या खेपेच्या भरल्याच्या पैशाचं चंदेरी पातळ मिळणारच आहे तुला माझ्याकडून. बस् आपण ही शाल घेणार." कशाचा तरी उन्माद यावा अशा तऱ्हेने तो बोलत होता व शेवटीं आरशासमोर जाऊन उभा राहिला.

विमल खाली मान घालून बसली होती. तिचा ऊर धडधडत होता. वामनची दृष्टि तिच्यावर खिळली होती.

घड्याळांत ठण्ठण् असे दहा ठोके पडले.

"अरे हें काय ? दहा वाजलेच की. १०॥ ची एक्स्प्रेस् आहे. चला ! विमल, थोडं गरम दूध दे बरं. निघालंच पाहिजे." त्याने बॅग् बंद केली. त्यावर होल्डॉल् ठेविला. विमल हळू हळू स्वैपाकघरांत जात होती. तिच्याकडे तो भावनावशतेने पाहूं लागला. ती आंत जातांच त्यानं समाधानाचा एक श्वास सोडला. "खरंच, किती चांगली पोर आहे. मी खरोखर किती सुखी आहें !" त्यानं वामन-जवळ जाऊन त्याच्या खांद्यावर हात ठेवले.

"वामन, तूं लवकर लग्न कर बुवा. जगांत अगदी एकटा आहेस."

"कां ? तूं आहेस अन्—"

"विमल आहे. असंच ना ? खरं आहे, पण बाबा, बहीण ती बहीण, अन् बायको ती बायको. बायकोची सर बहिणीला केव्हाही यायची नाही. Wife ! wife ! you don't know what it means. बहिणीवरचं प्रेम–प्रेम–तें ठीक आहे. पण जिच्यावर आपलं खरं प्रेम आहे, त्या बायकोकरतां पुरुष काय वाटेल तें करायला तयार—wife—तुला नाही कळायचं तें, तुझी बायको तुला मिळाल्या-शिवाय." वामन दचकला. श्रीधर वामनशीं बोलत होता, पण त्याची दृष्टि अंतर्मुख होती. डोळे अश्रूंनी भरून आले होते.

विमल दुधाचे दोन कप घेऊन आली. तिची चाहूल ऐकून वामन एकदम दूर झाला. श्रीधर भानावर आला.

"हें काय, इतक्यांत झालं गरम दूध ?" एकीकडे बघून त्याने डोळे पुसले.

एक पेला तिने श्रीधरच्या हातीं दिला. दुसरा पेला वामनपुढे ठेवीत असतांना त्याच्या हाताला तिचा स्पर्श झाला. तिचा हात कापूं लागला—तरी तिने चटकन पदर सावरला. मागे वळली तों तिचा धक्का लागून श्रीधरच्या हातांतील पेला खाली पडला. पडतांना बरेंचसें दूध तिच्या अंगावर पडलें. "च् च्—बरं असूं दे. तूं लुगडं बदल. उशीर झाला, मीच आणतों दुसरं दूध. असं म्हणून कपाचे तुकडे त्याने भरकन उचलून बाजूला टाकले. जमिनीवरील दूध हाताने सारवून टाकलें.

विमल मुकाट्याने आंत गेली. तिच्याकडे पहात वामनने दुधाचा पेला ओठाला लावला. सर्व दूध त्याने एका श्वासांत गटागट पिऊन टाकलें. दुधाचा दुसरा कप घेऊन श्रीधर घाईने बाहेर आला. बशींत निववून तें भराभर प्याला. सूटकेस व इतर सामान त्याने बाहेर गॅलरींत ओढून ठेवलें.

"विमल, चल आटप लौकर. दहा वीस झालेत. मला वाटतं टॅक्सींतूनच जावं. म्हणजे लौकर जातां येईल. चला ! वामन, आपण टॅक्सी आणूं. विमल, आम्ही येतों हं आता."

दोघेही जण पांच मिनिटांत शेजारच्या नाक्यावरून टॅक्सी घेऊन आले. विमलला हाक मारीत श्रीधर दरवाजा उघडून आंत गेला. वामन त्याच्या पाठीशींच होता. इतक्यांत विमल बाहेर आली. दरवाजांतनं आलेला गार वारा तिच्या अंगावर येताच तिचं अंग थरारलं. त्याबरोबर झटक्यामुळे सैलसा बांधलेला तिच्या केसांचा अंबाडा सुटला व तिचे लांबसडक काळेभोर केस खांद्यावर व

पाठीवर पडले. ती पांढरें स्वच्छ पातळ नेसली होती व पांढराच, अंगाबरोबर होणारा ब्लाऊज तिने अंगांत घातला होता. कपाटांत सेंटच्या बाटलीजवळच पातळ ठेवलं होतं. त्यामुळे त्याचा मंद सुवास येत होता. त्यांनच संध्याकाळीं तिच्याकरितां आणलेली मोगऱ्याची वेणी पलंगावर पडली होती, तिच्यांतील फुलांच्या वासाची भर पडली होती.

त्या दोघांचीही दृष्टि इलेक्ट्रिक लाइटमधे उभ्या असलेल्या विमलवर खिळून राहिली. तिच्या डोळ्यांत एक तऱ्हेची विलक्षण आतुरता दिसत होती.

"विमल" श्रीधरने नकळत हाक मारली. जाण्याचा बेत रहित करावा, वामनला असाच्या असाच घरीं जावयाला सांगावं, अन् आपण व विमल—असा विचार त्याच्या डोक्यांतून वेगाने निघून गेला.

"काय म्हणत होतात ?"

"कांही नाही. एकदा वाटलं नाही जाऊं. पण छे, गेलंच पाहिजे. चल वामन." त्याने झटकन् उत्तर दिलें व तो सामानाकडे गेला. वामनलाही त्याच्या मागे जाणें भाग पडले. एकदोन पावलें दोघे गेले नाहीत तोंच श्रीधर मागे फिरला, "हें पहा, तूं आता अभ्यास करूं नकोस. फार थकेलली दिसतेस." त्याचा स्वर अत्यंत कोमल होता. त्याच्यांत प्रेम काठोकाठ भरलेलें दिसत होतें.

"वामन, तूं हिला वाचूं देऊं नकोस आता. नाहीतर मी गेलों की बसा थोडं गप्पा मारीत दोघे. म्हणजे बरं वाटेल जरा हिला. आता अगदी अभ्यास करायचा नाही बरं का !" असें म्हणून त्याने खोलींतील दिवा मालवला व नाइट लँप लावला. आपणच दिवा मालवला, तेव्हा आपल्या इच्छेला ही मान देईल अशी त्याच्या

प्रेमळ अंतःकरणाची जणू काय खात्री होती. "येतों हं-दोन दिवसांनी खास येईन. एक महिन्यांत बाहेर पडलों नाही, सवय मोडली बाहेर जाण्याची." सामान उचलून दोघेहि खाली गेले.

श्रीधर टॅक्सींत बसला. मोटरचें इंजिन सुरू झालें. "तिला मी येईतों चैन पडणार नाही. एक महिन्यांत बाहेर गेलों नाही— जरा वेळ तिच्याजवळ बस, मग जा हं" मोटार चालूं लागतांच श्रीधर म्हणाला.

"बरं" घोगऱ्या आवाजांत वामनच्या तोंडून उत्तर गेलें. धावत्या मोटरकडे तो पहात होता. ती दृष्टीआड झाली. त्याचें सर्व शरीर थरथर कापत होतें. त्याचा श्वासोच्छ्वास जलद चालला होता. एक क्षणभर येथे थांबणें अशक्य आहे अशा तीव्र इच्छेने तो परत फिरला. मनुष्य जितक्या वेगाने जिना उतरतें त्याच्या दुप्पट वेगाने तो जिना चढून वर गेला. खोलींत शिरतांच त्याची दृष्टि, सर्व वृत्ति, नाईट लँपच्या मंद उजेडांत पलंगाला टेकून उभ्या असलेल्या विमलकडे एकवटून गेली.

कसे तरी एकदाचे मागे हात करून त्याने दार लोटलें. तीरासारखा तो तिच्याकडे गेला व आपल्या हृदयाशीं त्याने तिला कडकडून धरलें.

"अशी आज भेटलीस." कसें तरी अडखळत बोलून तिला अधिकच कडकडून त्याने जवळ घेतलें.—

खोलींत नाईट लँप मंद जळत होता.

—२—

टॅक्सी चालू झाली. आपला ब्लॉक दृष्टीआड होईतों तो मागे वळून पहात होता. तो दृष्टीआड होतांच त्याने एक निराशेचा व दुःखाचा श्वास सोडला. शुभ्रवेषभूषित विमलची कमनीय मूर्ति—

विशेषतः डोळ्यांतील शेवटची आतुरता त्याच्या दृष्टीसमोर होती. एक क्षणभर त्याला वाटलें, टॅक्सी अशीच्या अशीच मागे परतवावी. त्याप्रमाणे तो सांगणार, तोंच टॅक्सी एकाएकी थांबली.

" काय झालं ! "

" रस्तादुरुस्ती चालली आहे,-म्हणून बंद आहे. जरा तिकडून घेतों. त्याने टॅक्सी वळवली व वेगांत चालवली. गार वाऱ्याचा झोत त्याच्या अंगावर आला. त्याने स्वाभाविकच शाल सावरून अंगाभोवती घेतली. विमल नेहमी डोक्याला लावीत असलेल्या सुगंधी तेलाचा सुवास त्या शालीला येत होता. प्रेमभरांत त्याने त्या शालींत आपलें तोंड झाकलें. त्याची सर्व वृत्ति विमलमय होऊन गेली.

दोन वर्षांपूर्वी त्याचें लग्न झालें, तेव्हा त्याला ७५ रुपये पगारावर + + + + विमा कंपनींत नोकरी लागली. तो ग्रॅजुएट होता, पण बेकारीमुळे मिळाली ती नोकरी पत्करणें भाग होतें. तेवढयाच पगारांत विमलची तो हौस पुरवीत असे. कोणच्या वेळीं कोणची गोष्ट तिला आवडेल हें अगोदरच ओळखून तिच्याकडून तिचा उच्चार होण्यापूर्वीच ती गोष्ट करायची हा गोड छंदच त्याला लागला होता.

तिच्याकडून सुख घेण्यापेक्षा तिला तें देण्याच्या त्यागी आतुरतेने त्याचें हृदय नेहमी व्याप्त झालेलें असे.

म्हणूनच त्याने निघतांना, 'अभ्यास करूं नको' असें तिला प्रेमळ अधिकाराने बजावलें-तिला बरें वाटावें म्हणून तिच्याशीं थोडें बोलत बसण्याची विनंती आपल्या मित्राला तितक्याच प्रेमळ अधिकाराने केली. वामन त्याचा एकुलता एक मित्र; त्याचीही आठवण त्याला झाली. त्यांच्या संसारांत तो कसा एकजीव झाला होता.

" वामनच्या पूरक सहवासाशिवाय तुझं माझं जीवन कधीच सफल झालं नसतं," असें तो विमलला वारंवार म्हणे. तो

थोडा वेळ तिच्याजवळ घरीं आहे-तिला तितकें चुकल्यासारखें वाटायचें नाही, या कल्पनेने त्याला जरी थोडें बरें वाटलें, तरी विमलच्या डोळ्यांतील आतुरता त्याच्या डोळ्यासमोर उभी होती- त्याला मागे खेचीत होती.

बोरीबंदर आलें-ड्रायव्हरने हाक मारतांच तो दचकला. शालींतून तोंड काढण्यापूर्वी त्याने आपले ओठ तिच्यावर नाजूकपणे टेकले. हळुवारपणे तिच्यावरून आपला हात फिरवला.

"खरंच किती protection आहे या शालींत." नकळत हें वाक्य पुटपुटला व खाली उतरून प्लॅटफॉर्मवर गेला. कंपनीचा एक नोकर त्याची तेथे वाटच पाहत होता. "श्रीधरपंत, तुम्हांला आकोल्यास जायचं नाही. ते रानडे तिकडे जात आहेत. जळगावला आग लागून दोन लाखांचं नुकसान झाल. तिकडे जायला पाहिजे. बडे साहेब घरीं तुमची वाट पाहत आहेत. चला."

"हीच शेवटची गाडी. घरीं बोलावलं म्हणतोस, मग आज जाणार कसं?"

"आज नाही, उद्या जावं लागेल. पुष्कळ माहिती घ्यावी लागेल इथून, असं साहेब म्हणत होते."

आजचं जाणं रहित झालं म्हणून त्याला निरतिशय आनंद झाला "चल तर मग." असें अत्यंत उल्हासाने त्याने त्या नोकराला म्हटलें व तो झपाटयाने चालूं लागला.

—३—

साहेबाच्या घरीं त्याने जळगावच्या आगीविषयी सर्व माहिती घेतली. कागदपत्र भराभर पाहिले. दुसऱ्या दिवशीं सकाळच्या अलाहाबाद एक्सप्रेसने जायचें म्हणन तो घरीं जाण्यास उठला.

एकचा ठोका घडयाळांत पडलेला त्याने ऐकला. समोर दिसलेली टॅक्सी त्याने बोलावली व आंत बसून 'हाकल' म्हणून ड्रायव्हरला सांगितलें. रात्रींची वेळ व गिऱ्हाइकाची घाई बघून टॅक्सीवाल्याने दुप्पट भाडें मागितलें. श्रीधरने खिशांत हात घालून तेवढे रुपये तर दिलेच पण घराशेजारीं मोटर उभी राहतांच आणखी चार आणे त्याच्या हातावर फेकले. त्याचा सलाम घेण्याची वाट न पाहतां तो सामान घेऊन झपाझप जिना चढून वर आला. दरवाज्या-जवळ सामान ठेवीत असतांना मनांतील भावनांच्या खळबळीमुळे बॅग दरवाजाला लागली व दरवाजा उघडला गेला.

"दरवाजा उघडा ? दरवाजा उघडा कसा ?"

भीतियुक्त शंकेने तो किंचित् दचकला. क्षणमात्र विचार करून त्याने हलकेच दरवाजा उघडून आंत जाण्याचें ठरविलें. त्याने सामान तसेंच बाहेर ठेवलें. अंगावर शाल घट्ट ओढून घेतली व तो हळूच आंत शिरला.

नाईट लॅंप तसाच मंद जळत होता.

त्याची नजर स्वाभाविकच प्रथम आपल्या पलंगाकडे गेली. अन् पाहतो तों--त्यावर विमल आणि वामन—मृतवत झोपीं गेलेलीं. दोघांचींही वस्त्रें--

आकाशांतून डोक्यावर दगड कोसळावा तशी त्याची स्थिति झाली. सर्व विश्व एका क्षणांत त्याच्यासमोर फिरून गेल्यासारखें त्याला वाटलें. डोळ्यावरून त्याने हात फिरवला--पुन्हा त्याची दृष्टि त्यांचेकडे वळली. संतापाची ऊर्मि त्याच्या मस्तकांत उठली व, त्याच्या डोक्यावर मारण्यासाठी हाताशीं असलेला तांब्या त्याने वर उचलला तोंच त्याची नजर विमलच्या चेहऱ्यावर गेली--तेथेंच ती क्षणमात्र खिळली.

त्याचा हात हळूहळू खाली आला. त्याच्या दृष्टींत एक प्रकारचें अवर्णनीय असें मार्दव आलें. अंतःकरणांत विलक्षण कालवाकालव झाली. स्वतःला स्थिर करण्याकरतां त्याने आपला हात स्वाभाविकच हृदयावर ठेवला. तोंच त्या शालीचा त्याला स्पर्श झाला. निमिषार्धांत त्याचा कांही तरी निश्चय झाला. अंगावरची शाल त्याने काढली व अगदी हलक्या हाताने दोघांच्या अंगावर घालून त्यांचें अंग झाकून टाकलें. आपली मान त्याने पटकन् फिरवली—तो खोलीच्या बाहेर आला व त्याने दरवाजा पुन्हा ओढून घेतला.

सामान हातांत घेऊन तो उभा राहिला तेव्हा त्याचें सर्व शरीर कंपित झालें. आपण खाली पडूं अशी त्याला भीति वाटली. त्याने देवाचें स्मरण केलें. एकदोन दीर्घ श्वास घेतले व झपाझप जिना उतरून तो खाली गेला. ज्या टॅक्सींतून तो परत आला होता तीच एकटी नाक्यावर उभी होती.

कोणीतरी हृदयांत खंजीर खुपसावा तशा वेदना त्याला झाल्या. पण त्याचा निश्चय ढळला नाही. त्याच टॅक्सींत बसून तो स्टेशनवर आला व सकाळच्या एक्सप्रेसने जळगावीं गेला.

—४—

पहाटे पांच वाजतां दूधवाल्याची हाक ऐकतांच तीं दोघेही खडबडून जागीं झालीं. विमलने ओ दिली व चटकन् आपल्याला नीटनेटकें करून तिने दूध घेतलें व मोठा दिवा लावला. तिची नजर साहजिकच वामनकडे गेली व तिच्या हातांतून दुधाचें भांडें खाली पडलें.

"हें काय ? काय झालं" म्हणून तो उठतो तों भयभीत झालेल्या विमलच्या तोंडचा एकच शब्द त्याच्या कानीं आला.

"शाल !"

—५—

झाला प्रकार कसा झाला म्हणून तर्क करावा—परिणामाच्या भीतीने मरून जावें की समोर बसलेल्या हताश स्त्रीचें सांत्वन करावें--काय करावें हेंच त्याला प्रथम सुचेना.

"तो आंत कसा आला?" स्वतःशींच त्याने प्रश्न केला. डोक्यावरून हात फिरवला—त्याची स्मृति जागृत झाली—"रात्रीं वासनेच्या आहारीं गेल्यामुळे आपण दरवाजा लावण्यास विसरलों."—त्याच्या—कांही वेळाने तिच्याही--डोक्यांत लख्ख प्रकाश पडला—

"आता पुढे—."

—६—

तिसऱ्या दिवशीं सकाळीं ठरल्याप्रमाणे श्रीधर मुंबईस परत आला. आल्यावर त्याचें वागणें अगदी नेहमीसारखें होतें. एक तसूमात्र त्यांत फरक नाही. रात्रीं वामन आला. त्याची मान नम्र होती. पण त्याचीही नेहमीप्रमाणे थट्टा करून त्यानें संभावना केली. परीक्षा दोन महिन्यांवर आली तेव्हा कसोशीनें अभ्यास करून घे म्हणून त्याला बजावलं.

हाच क्रम रोज चालला होता. महिना लोटला. विमलचें अभ्यासाकडे लक्ष मुळीच लागेना. ती अशक्त होत आहे असें श्रीधरला दिसलें. प्रेमळपणाने त्याने तिची चौकशी केली. मला अभ्यास नको, म्हणून तिचें उत्तर आलें. तो थोडा वेळ स्तब्ध बसला व नंतर हळूच म्हणाला—

"तूं जी. ए. व्हावंस ही माझी हौस तूं पुरवणार नाहीस का?"

त्याचा स्वर कंपित झाला.

तो एकदम् गंभीर झाला. तिच्या अंतःकरणाला वेदना झाल्या

"होईन मी जी. ए." ती निश्चयाने म्हणाली.

श्रीधर पुन्हा एका दिवसासाठी बाहेर गेला होता. ऑफिसचें काम होतें. श्रीधरला जाऊन १२ तास होऊन गेले होते. स्वतंत्र विचाराला तिला अवसर मिळाला होता. वामन रात्रीं आला तेव्हा श्रीधर बाहेर गेल्याचें सहजच कळलें. अभ्यासाचें पुस्तक उघडण्या-पूर्वीच ती एकदम म्हणाली—"त्यांच्या या अलौकिक प्रेमामुळेच मी मरून जाईन की काय?—"

"प्रेम? प्रेम की दया—" तिची दृष्टि एकदम त्याच्या चेहऱ्याकडे गेली. अन् डोळ्याने जें दिसलें तें-तेंच-तेंच ती पाहत राहली. तो एकदम जवळ आला व तिचे हात धरून जवळ ओढणार तों तिने त्याला हळूच पण निश्चयाने दूर केलें.—"नको"—एवढंच ती उद्गारली. स्वर कंपित होता पण— त्याने पुन्हा तसेंच करण्याचा प्रयत्न अतिरेकाने करतांच ती किंचा-ळली— "दूर, दूर व्हा" तो स्तंभित झाला—त्याला—तिचा चेहरा पाहून थोडा ओशाळला. ती शांतपणे म्हणाली—"चालते व्हा. प्रेम नी दया यांतला फरक मला कळतो. तसाच प्रेम नी वासना यांतलाही कळतो. हा फरक कळण्याइतकी तरी मी शुद्धीवर आहें म्हणून देवाचे आभार—जा—पुन्हा येऊं नका."

तिच्या शब्दांच्या अर्थाबद्दल त्याला तिळमात्र संशय राहूं नये असाच तिचा एकंदर आविर्भाव होता. "आता हें संपलं" या मनाच्या खात्रीने तो बाहेर पडला.

  

श्रीधर दुसरे दिवशीं घरीं आला तोंच वामनचें एक पत्र आलें

" इस्टेटीची कांही भानगड अकस्मात उत्पन्न झाल्यामुळे मी सकाळीं कोकणांत जात आहे. परत यायला किती दिवस लागतील सांगतां येत नाही. विमलच्या परीक्षेची काळजी वाटते. पण क्षमा करा.

वामन "

श्रीधरने तें पत्र विमलच्या हातीं दिलें. तें वाचून तिने समाधानाचा श्वास सोडला. श्रीधरने एकच क्षण तिच्या नजरेला नजर भिडवली "ही दृष्टि नवी दिसते आहे—" एवढेंच तो मनाशी बोलला व चहा प्यायला लागला.

तिचा अभ्यास चौपट जोरांत सुरू झाला. तिने रात्रीचा दिवस केला. शरीराकडे बघितलें नाही. कशाकडे बघितलें नाही. कसलें तरी साध्य मिळवण्याची ती धडपड होती. परीक्षेंतील यश हेंच तें साध्य की—कांहीही असो. 'प्रेम की दया' हे वामनचे शब्द तिच्या कानांत एकसारखे घुमत राहून तिचा निश्चय टिकवीत होते

  

परीक्षा झाली. पेपर्स उत्तम गेले. एक महिन्याने ज्ञानप्रकाशांत निकाल प्रसिद्ध झाला. पास झालेल्या मुलींत ती बरीच वर आली. तिला दोन बक्षिसें मिळालीं. श्रीधरने हसत हसत तिच्या हातीं ज्ञानप्रकाश दिला. निकाल वाचल्यावर गंभीर हास्य तिच्या चेहऱ्यावर दिसूं लागलें.

संध्याकाळीं रोजच्या पेक्षा जरा लौकर श्रीधर घरीं आला. कपडे न काढतां "चल, जरा माझ्या बरोबर बाहेर काम आहे." असें म्हणाला. तिने मुकाट्याने चपला घातल्या व ती चालूं लागली. दोघेही आठवले शहाड्यांच्या दुकानांत शिरलीं.

" चांगलीं सुरेख चंदेरी पातळं दाखवा बरं." त्याने तेथील मॅनेजरला हुकूम सोडला व विमलकडे बघितलें. ती अगदी शांत

होती. घडतें आहे तें अगदी सहज स्वाभाविकच घडतें आहे असा भाव तिच्या चेहऱ्यावर होता. पातळांचा गठ्ठा समोर येऊन पडतांच श्रीधरने तिला आपल्या आवडीचें निवडण्यास सांगितलें.

"तुम्हांला आवडेल तेंच घ्या." तिने हळूच उत्तर दिलें. थोडयाच वेळांत पातळाचें पार्सल घेऊन दोघें घरीं आलीं. एकदा चहा घेतला होता तरी आणखी एकदा विमलने चहा करून त्याला दिला. कप ठेवतांच-- "सहा वाजले, आपण सिनेमाला जाऊं या कां ?" त्याने प्रश्न केला. तिने वर बघितलें व लगेच उसळीनं "हो जरूर" असें म्हणून ती आंत गेली. दहा मिनिटांनी बाहेर आली ती चंदेरी पातळांत.

श्रीधर तिच्याकडे पहातच राहिला.

  

या प्रसंगानंतर वर्ष लोटलें. या अवधींतील 'विशेष' म्हणजे दुसऱ्यापासून घेण्यापेक्षा दुसऱ्याला देण्याकरतां त्या दोघां-मध्ये चाललेली अहमहमिका. विमल कृश दिसत होती पण तिच्या चेहऱ्यावरचें गंभीर हास्य केव्हाही नाहीसें झालें नाही.

श्रीधरचें वागणें अगदी सुसंगत. त्यांत बघणाऱ्याला बाह्यतः तिळमात्र फरक दिसत नसे.

घरांत पवित्र शांतीचें वातावरण एकसारखें नांदत होतें.

पण त्यांत जिवंतपणा होता का ?



एके दिवशीं कल्पना नसतां जोराचा गारांचा पाऊस पडला. श्रीधर नखशिखान्त भिजून घरीं आला. विमलने घाईने त्याचे कपडे बदलले. कारण दोन दिवसांपासन त्याला अगोदरच जरा

बरें नव्हतें. रात्रीपर्यंत सर्व ठीक होतें, पण रात्रीं त्याच्या कण्हण्यानें ती जागी झाली. थर्मामीटर लावून पहाते तों १०३ ताप. रात्रीं जे काय उपाय करावयाचे ते सर्व तिने केले. दुसऱ्या दिवशीं डॉक्टरांनी पाहिलें. "थंडी वाऱ्याचा आहे. वाटेल १–२ दिवसांत बरं." असें म्हणून ते गेले.

तीन दिवस झाले ताप उतरला नाही. तेव्हा तिने चांगल्या डॉक्टरांना बोलावलें. टायफाईड व न्युमोनिया आहे अशी चिकित्सा झाली. फार जपायला पाहिजे असें ते म्हणाले. त्या दिवसापासून विमल स्वतःला विसरली. घरांतलें काम करून शुश्रूषा करायला जड जातें म्हणून नर्स ठेवण्याची कल्पना निघाली तेव्हा तिने ती निश्चयाने दूर सारली व स्वतः डॉक्टरांच्या सूचनेप्रमाणे शुश्रूषा करूं लागली. नवव्या दिवशीं छाती साफ झाल्याचें डॉक्टरांनी जेव्हा सांगितलें तेव्हा तिने मनोभावें देवाची प्रार्थना केली. परंतु "प्रतिकारशक्ति कमी झाली आहे. अद्याप टायफॉईड आहेच. तेव्हा आणखी गुंतागुत होऊं नये म्हणून फार जपलें पाहिजे" असें डॉक्टरांनी सांगतांच तिच्या तोंडचें पाणी पळालें.

विसावा दिवस उजाडला. श्रमानें व काळजीने ती पांढरी फटफटीत पडली होती. दिवसा तर ती पडत नसेच पण रात्रीं श्रीधरचा डोळा लागला की ती देवाची एकसारखी प्रार्थना करी. त्या कारुण्यमूर्तीकडे श्रीधरला पाहवत नसे. "यांतून एकदा मला सोडव" अशी तोही मनांतून परमेश्वराची प्रार्थना करी.

विसाव्या दिवसाची रात्र आली. "उद्या २१ वा दिवस आहे. बहुतेक उद्या ताप उतरेल, तेव्हा तर त्यांना अतिशय संभाळलं पाहिजे. आजची रात्र म्हणजे आणीबाणीची रात्र आहे—संभाळा." वगैरे सर्व तऱ्हेच्या सूचना देऊन डॉक्टर गेले. बारा वाजले. ताप १०४ च्या खाली येईना. पुढे १०५ झाला. तिच्या तोंडचें

पाणी पळालें. डोक्यावर बर्फाची पिशवी ठेवून ती बसली होती. तिला आता अश्रु आवरेनात. शेवटीं दोन अश्रु श्रीधरच्या गालावर पडले. तो पूर्ण शुद्धींत होता.

"विमल" तिचा हात धरून त्याने हांक मारली.

"नका बोलूं. श्रम होतील ना?"

"नाही. मी बोलणार. विमल कशाला रडतेस? मी आता जगत नाही. माझं ऋण तूं फेडलंस. रात्रीचा दिवस केलास—ऋण फेडलंस—आता एकपरी मी गेलों तर तें बरंच-म्हणजे वामन तुला—"

"नका जाऊं—नका असं बोलूं—नका जाऊं ना—माझ्या-करतां." तिने गाईसारखा हंबरडा फोडला व आपली मान त्याच्या छातीवर टेकली.

"उगी-उगी-नको जाऊं? तुझ्याकरैता?—पण प्रेम-प्रेम-"

ती एकदम उठली. त्याचे हात तिने आपल्या हातीं घट्ट धरले—आपली नजर त्याच्या नजरेला भिडवली-अशा अवस्थेंत अत्यंत महत्त्वाचे असे कांही क्षण गेले. ती गंभीर शांततेने बोलूं लागली.

"होय माझ्याकरतां. माझ्याकरतां. काय म्हणालांत? प्रेम? प्रेम—अहो, तुम्हा पुरुषांना कळत नाही. जगांत प्रेम वाटेल तितकं मिळतं—पण तुम्ही केलीत तशी खरोखरीची त्यागी क्षमा करणारं माणूस मिळत नाही—अंगावर शाल घालून क्षमा केलीत —खरंच त्या शालींत किती protection होतं हें मला गेल्या वर्षांत एकसारखं कळत होतं. क्षमा केलीत, तें माझ्यावरचं प्रेम टिकवून. किती यातना होत होत्या तुम्हांला तें मी बघत होतें. अपरात्रीं उघडे डोळे ठेवून वर टक लावून बघतांना मी किती वेळां

पकडलं आहे—किती यातना होत होत्या—खरी क्षमा केलीत–अन् आता जातां–नका जाऊं–माझ्याकरतां."

एकेक शब्द हृदयाच्या तळमळीनं निघत होता. तिचा उच्चार स्पष्ट होता—वाणींत तिची तपश्चर्या स्पष्ट दिसत होती. प्रत्येक शब्द तो आपल्या हृदयांत साठवीत होता.

क्षणभर दोघांमधे पवित्र शांतता पसरली.

तो हलकेच बोलूं लागला—"मी कसली क्षमा–तूं सुखी व्हावंस म्हणून जावंसं वा—तुझ प्रेम—" तिने एकदम त्याच्या तोंडावर हात ठेवला.

"नका बोलूं. मला समजलं. मी बोलायची थांबलें–माझं बोलणं खोटं वाटेल या वेळीं–तुमचा जीव वाचवून उपकारांची जणू परतफेड करण्याकरता मी बोलतें असें वाटेल म्हणून थांबलें. पण आता–आता नाही. काय समजूत आहे तुमची ? ज्या वेळीं क्षमेची शाल अंगावर पाहिली त्याच वेळीं दया व प्रेम यामधला भेद मला समजला. अन् अन् अन्–वासना नी प्रेम यांतलाही फरक नंतर कळून चुकला. माझं खरं प्रेम आपल्यावर होतं. आपल्या यातना पाहून त्या प्रेमाची मनोमय साक्ष मला पटली. कळलं ? वाटल्यास विश्वास ठेवा–जगा–नका जगूं–मला कशाची पर्वा नाही." ती बेदरकारपणे दूर झाली. तिचा तो एकंदर अवतार पाहून त्याला क्षणांत सर्वस्वाची मनोमय साक्ष पटली.

आपली सर्व शक्ति एकवटून त्याने तिला जवळ ओढली. तिचें मस्तक आपल्या छातीशीं घट्ट धरलें.

—८—

श्रीधर पूर्ण बरा होऊन एक महिना झाला होता. "या जन्मांत पुन्हा आपण आजारी पडणं शक्य नाही." विमलच्या

मांडीवर डोकें ठेवून तो एकदा म्हणाला.

"नको बाई पडायला" तिने त्याचें मस्तक वर हृदयाशीं धरलें व त्याच्या केसांतून आपलीं नाजूक बोटें फिरवलीं.

"पण कां ठाऊक आहे ?"

"कां ?" प्रेमाने त्याच्या डोळ्यांत बघत तिने प्रश्न केला.

"अग, तुझ्या प्रेमाची शाल माझ्या अंगावर आता सतत आहे ना ! काय छाती आहे रोगाची या शालींत शिरण्याची ?"

"शाल ? खरंच—अगदी खरं."

त्याचें मस्तक तिने हृदयाशीं घट्ट धरलें. त्यावर तिचे गाल टेकले—डोळ्यांतून दोन आनंदाश्रु त्याच्या केसांवर पडले.

"शाल--खरंच शाल" ती पुटपुटली.

